
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)


महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'नवी क्षितिजे' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (त्रैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे संपादक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि नवी क्षितिजे संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका



# नवी क्षितिजे

**१८५७ च्या ब्रिटिशविरोधी भारतीय उठावामागच्या, युटोपिय धारणा**

**मूळ लेखक हॅरॉल्ड गुल्ड**

**अनुवादक : ज. द. जोगळेकर**

वर्ष-९
अंक-33

३३

# नवी क्षितिजें

संपादक
नाना जोशी
विश्वास पाटील
रचना
पामार्ट
मुंबई २८
पत्र व्यवहाराचा पत्ता
विश्वास पाटील
७३ पुष्प कुंज, पालखी वाडी
काशिनाथ धुरू रोड
मुंबई २८
मुद्रक व प्रकाशक
शुभांगी जोशी
३२९ वि. प. रोड मुंबई ४
वार्षिक वर्गणी
रु. १२-५०–

मुद्रण स्थळ :
ना. दा. चावरे
नागरिक छापखाना
२३० व्यंकटपुरा, सातारा.

## अनुक्रमणिका



किंमत ५ रुपये

# संपादकीय :

नवी क्षितिजेचा हा ३३ वा आणि ३३ ते ३६ श्रेणीतला पहिला अंक. या अंकापासून नवी श्रेणी सुरू होत आहे.

प्रत्येक अंकात विचाराना चालना देणारे काही ना काही साहित्य देण्याचा आमचा परिपाठ आहे. याही अंकात तो परिपाठ संभाळण्याचा प्रयत्न आम्ही केला आहे. १८५७ चा भारतीय उठाव हा आमच्या इतिहासातील तसा खूप चर्चिलेला विषय. याच विषयावरचे हे नवीन लिखाण अनुवाद करून आम्ही येथे देत आहोत. या विषयातील एक व्यासंगी विद्वान श्री. ज. द. जोगळेकर यानी अनुवाद केला आहे. श्री. जोगळकरानी हा अनुवाद जरी केला असला तरी त्यातील सगळयाच प्रतिपादनाशी ते सहमत आहेत असे नाही. किंबहुना फुरसत लाभताच याच विषयाचा उत्तरपक्ष ते मांडणार आहेत.

**संपादक**

अनुक्रमणिका



# प्रस्तावना

, १८५७ सालचा भारतीय उठाव आणि सत्ययुगी कल्पनांचा त्या उठावावरचा प्रभाव हा लेख डेव्हिड डब्ल्यू प्लाथ यानी संपादित केलेल्या 'अवेअर ऑफ युटोपिया ' या ग्रंथावरून तयार केला आहे. भारतीय युद्धनेतृत्व या ग्रंथाचे प्रसिद्ध लेखक श्री. ज. द. जोगळेकर यानी तो तयार केला आहे. मूळ लेख हॅरॉल्ड गुल्ड यांचा आहे.

१८५७ साली आपल्या देशात तत्कालिन ब्रिटिश वर्चस्वाविरुद्ध जे काही घडले त्याची मीमांसा निरनिराळया लोकांनी निरनिराळया प्रकारे केली आहे. जे भारतीय लेखक प्रखर राष्ट्राभिमानाने प्रेरित आहेत ते म्हणतात की, १८५७ चा उठाव हे केवळ ब्रिटिशांविरोधी शिपायांचे साधे बंड नव्हते; तर ब्रिटिश लोकानी येथील लोकांचे जे स्वातंत्र्य हिरावून घेतले होते ते त्यांच्यापासून परत मिळविण्यासाठी आमच्या लोकांचा तो मोठा लढाऊ प्रयत्न होता.

म्हणजेच १८५७ चा उठाव हे स्वातंत्र्ययुद्ध होते. याच्या उलट पाश्चात्य तसेच येथलेही काही विद्वान आहेत की, ज्याना १८५७ च्या लढ्यातला हिंदी सामान्य नागरीकाचा सहभाग दिसत नसल्याने हा लढा ही ब्रिटिशांवर नाराज असणाऱ्या ब्रिटिश फौजेतल्या हिंदी शिपायांची केवळ भाऊगर्दी वाटते.

१८५७ संबंधी अशा प्रकारे दोन परस्परविरोधी मतप्रवाह आढळतात. इतिहास सशोधकांच्या एका गटाला ती घटना स्वातंत्र्ययुद्ध वाटते तर दुसऱ्या गटाला तीच ब्रिटिशविरोधी फौजी उचल वाटते.

श्री. गल्ड यानी वरील भूमिकांपेक्षा अगदी वेगळी भूमिका घेतली आहे. ते म्हणतात की, १८५७ च्या घटनेत स्वातंत्र्ययुद्ध आणि शिपायांची भाऊगर्दी असे दोन्ही प्रकार दिसतात. परंतु या दोन्हींच्या पलिकडचे असेही आणखी काही घटक त्या घटनेत आहेत. व त्यांचाच वरचष्मा या घटनेवर दिसतो.

---

('अवेअर ऑफ युटोपिया' – संपा. डी. डब्ल्यू प्लाथ युनिव्हर्सिटी ऑफ इलिनॉस प्रेस. १९७१ )

म्हणून हे इतर महत्वाचे घटक बाजूला काढून त्यांच्या सहाय्याने स्वातंत्र्ययुद्ध आणि शिपायांच्या भाऊगर्दीच्या मतांचा उहापोह केला जावयास हवा.

१८५७ चा उठाव ब्रिटिशांना या भूमीवरून घालवून देण्यासाठी घडून आला होता. यात कोणालाही शंका असू नये. ब्रिटिश लष्करातल्या शिपायांच्या ब्रिटिश मालकाविरुद्ध काही वैयक्तिक तक्रारी होत्या व त्या तक्रारींमुळे ते ब्रिटिश राजकर्त्यांविरुद्ध फिरले होते ही गोष्ट जरी कितीही खरी असली तरी ब्रिटिशांविरुद्ध फिरल्याने ब्रिटिश आता त्यांना त्यांच्या शत्रुवत् भासू लागला होता. व त्याला या भूमीवरून हाकलून देण्यासाठी ते कटिबद्ध झाले होते हेही तितकेच खरे आहे.

मातृभूमिवरून परकी सत्तेला हद्दपार करण्यासाठी केले जाणारे सर्व प्रयत्न हे स्वातंत्र्ययुद्धाचे प्रयत्न होत या स्वातंत्र्ययुद्धाच्या जुन्या व्याख्येनुसार पाहिल्यास हा उठाव स्वातंत्र्ययुद्धातच मोडतो परंतु फ्रेंच राज्यक्रांतीनंतर स्वातंत्र्य या शब्दाला जो एक नवा अर्थ प्राप्त झाला आहे तो अर्थ हिशेबात घेतल्यास १८५७ ची घटना स्वातंत्र्ययुद्धात मोडणार नाही असेही म्हणावे लागते. फ्रेंच राज्यक्रांतीने प्रस्थापित केलेली स्वातंत्र्याची तीन लक्षणे अशी : हे स्वातंत्र्य त्यात भाग घेणाऱ्या सर्वांचे व म्हणून सामुदायिक स्वातंत्र्य असते. त्यात कोणी एकटा ( उदा. राजा स्वतंत्र आणि इतर त्याचे अश्रित अशी भूमिका असू शकत नाही. स्वातंत्र्य म्हणजे एकजात सर्वांचे स्वातंत्र्य. १८५७ सालच्या उठावात यापैकी काही दिसत नाही. ब्रिटिश गेल्यानंतर त्यांनी खाली केलेल्या गादीवर येथले परंपरागत राजे - नबाब बादशहा आरुढ होणार होते आणि सामान्य जनता पुन्हा एकदा या सर्वांची अंकित म्हणून पुढे राहणार होती. राज्यकारभारात लोकांच्या आशा आकांक्षाना काहीही स्थान राहणार नव्हते. ब्रिटिश जाऊन त्यांच्या जागी मराठ्यांचा पेशवा मोगलांचा बादशहा, किंवा वजीर हेच लोक गादीवर येणार असल्याने जनतेच्या मूळ स्थितीमध्ये कसल्याही प्रकारचा होकारात्मक बदल घडून येणारा नव्हता जनता पूर्वी जेथे होती तेथेच म्हणजे कुणातरी मातबराच्या हुकमाची तावेदार म्हणूनच राहणार होती. सारांश व्यापक अर्थाने स्वातंत्र्य हा शब्द त्या लढ्यात भाग घेणारांना अभिप्रेत नव्हता.

दोन, खऱ्या स्वातंत्र्ययुद्धात न्याय हा सर्वांसाठी समान असला पाहिजे अशी कल्पना अनुस्यूत असते आणि तीन, स्वातंत्र्य कोणापासून या प्रश्नाबरोबरच ते कशासाठी याही प्रश्नाची अस्पष्ट का होईना पण निश्चित जाण त्यात भाग घेणारांना असते. उदा. स्वातंत्र्ययुद्धात भाग घेणारांना ते युद्ध

जिंकल्यावर स्वतःच्या परिस्थितीत सुधारणा घडवून आणावयाच्या असतात. आपली प्राप्त परिस्थिती ठीक नाही; ही परिस्थिती बदलली गेलीच पाहिजे व ती बदलली म्हणजे आपली स्थिती सुधारेल असे वाटल्यानेच लोक या प्रकारच्या युद्धात सामील होतात. जनतेचे स्वातंत्र्य, जनतेला समान न्याय व तिच्या परिस्थितीत वऱ्यासाठीचा पालट या तीन मागण्यांसाठी परकी व स्वकीय राज्यकर्त्यांबरोबर जी युद्धे होतात त्यांना स्वातंत्र्ययुद्ध हा शब्द प्रकर्षाने आज लावला जातो.

१८५७ च्या लढ्यात यापैकी काहीही दिसत नाही. ब्रिटिश गेल्यानंतर येथे परत एकदा जुन्याच परंपरागत राजेमहाराजांचे राज्य प्रस्थापित होणार होते. या राज्यांमध्ये न्यायदानाची सोय जुन्याच तत्वांवर असणार होती म्हणजे काहीना खास सोयी व हक्क आणि इतर काहीना खास बंधने व हक्कांचा अभाव असणार होता. नव्या प्रकारच्या समाजाला म्हणजेच सुधारणाना तर या उठावकर्त्यांचा स्पष्टच विरोध होता. सारांश ब्रिटिशाना घालवून आपले राष्ट्रीय स्वातंत्र्य परत मिळविणे हा हेतू जरी या उठावामागे दिसत असला तरीसुद्धा शेवटी हे राष्ट्रीय स्वातंत्र्य मूठभर मिरासदार लोकांच्या फायद्यासाठी राबविले जावयाचे असल्याने व त्या स्वातंत्र्याचा फायदा बहुजनसमाजाला मिळावा अशी विचारसरणीच त्या लढ्यामागे नसल्याने गुल्ड १८५७ च्या लढ्याला शंभरटक्के स्वातंत्र्ययुद्ध म्हणू इच्छित नाहीत.

१८५७ च्या लढ्याला उद्देशून काही विद्वान ती केवळ शिपायानी केलेली भाऊगर्दी होती असे तुच्छतापूर्ण उद्गार काढतात. १८५७ विषयक याही मताशी गुल्ड सहमत नाहीत. ते म्हणतात की, हा लढा प्रामुख्याने ब्रिटिश लष्करातल्या शिपायांनी चालविला; ब्रिटिश राज्यकर्त्यांविरुद्ध या लष्करी शिपायांच्या काही तक्रारी होत्या, व त्या तक्रारींपायी ते त्यांच्याविरुद्ध उठले होते या सर्व गोष्टी जरी कितीही खऱ्या असल्या तरी येथील सर्वसामान्य जनतादेखील काया-वाचा-मने या लढयात त्यांच्याबरोबर उतरली होती, ही गोष्टसुद्धा तितकीच खरी आहे.

शिपायांची ब्रिटीशविरोधी प्रतिक्रिया ही केवळ उत्स्फूर्त संतापाचा उद्रेक नव्हता. त्या उद्रेकामागे पूर्वनियोजित योजना व आखणी होती. या उठावात येथील जनता स्वतः होऊन प्रत्यक्ष वा मनाने सामील झाली होती. हे सर्व घडले होते कारण येथील सर्वसामान्य जनतेलासुद्धा ब्रिटिश राजवट हे त्यांच्या पवित्रतम देशावर, धर्मावर व संस्कृतीवर ओढवू घातलेले संकट व एक संभाव्य धमकी (थ्रेट) वाटत होती. तर दुसरीकडे ब्रिटिश लोक



अनुक्रमणिका

खूप दिवस आमच्या भूमीवर राहिले आता त्याना या पवित्र भूमीवरून काही झाले तरी जावे लागणार आहे आणि एकदा का ते येथून गेले की पुन्हा पहिल्यासारखे सुखाचे दिवस आपण पाहू अशी आशाही त्यांच्या मनात घुमू लागली होती.

असे दिसते की, भारतीय लोक वैयक्तिक पातळीवर काही करण्याऐवजी सामुदायिक पातळीवरच आपल्या प्रतिक्रिया व्यक्त करतात. येथील लोकांचे सामूहिक मन जितके प्रबळ आहे तितकी त्यांची वैयक्तिक विचारशक्ती प्रबळ नाही. येथील मनुष्ये एकेकटयाने विचार करून कृती करण्याऐवजी एखाद्या वावटळीत सापडून सर्वांनी काहीतरी एकच सामुदायिक झटपट कृती करावी अशा प्रकारे वागताना दिसतात. विशेषत: एके बाजूस कसलीतरी गर्भित धमकी ( थ्रेट ) व दुसऱ्या बाजूस त्या धमकीपासून वाचविणाऱ्या खऱ्याखोटया आश्वासनाचा पुकारा दिसल्यास येथील लोक धमकीपासून पळ काढून आश्वासनाकडे डोळे मिटून धाव घेतात.

१८५७ साली जे काही या देशात घडले ते आताच आपण वर ज्या प्रवृत्तीचा उल्लेख केला- गर्भित धमकीपासून पलायन व संभाव्य आश्वासनाकडे दौड या प्रकारात मोडते. त्यात पूर्वयोजना अजिवात नव्हती अशातला भाग नाही. उठावाच्या आधी अनेक दिवस शिपायात व लोकात असे काहीतरी घडावे व घडणार अशी उत्सुकता निर्माण झालेलीच होती. एवढेच नव्हे तर काहीतरी भयंकर येथे लवकरच घडणार आहे असे खुद्द कित्येक ब्रिटिशांना-सुद्धा मनातल्या मनात वाटत होते. हिंदी लोक तर श्वास रोधून ' या काहीतरी घडण्याची ' वाट पहात होते आणि १८५७ च्या उठावाच्या रूपाने शेवटी ते घडलेही.

काही इतिहाससंशोधक १८५७ च्या घडामोडीत कटाच्या मुद्याला फार महत्व देतात. त्यांच्या मते येथील पदच्युत राजे महाराजानी आपापसात गुप्त कट करुन व ब्रिटिश सैन्यातील हिंदी शिपायांना फितवून हा उठाव घडवून आणला होता. परंतु उठावात येथल्या राजेरजवाड्यानी सामील होण्याची वेळा व परिस्थिती जर वरोबर ध्यानात घेतली तर या प्रकारच्या निष्कर्षात काही तथ्य नाही असे लगेच दिसून येते. कारण शिपायांच्या ब्रिटिश-विरोधी उठावाला प्रारंभ आधी झाला व मागाहून शिपायानी जबरदस्ती केली म्हणून हिंदी राजेरजवाडे त्या वावटळीत सामील झाले. शिपायानी जर का राजेरजवाड्याना त्यांच्या पसंतीप्रमाणे वागण्याची मुभा दिली असती तर ते या लढ्यात सामील झालेसुद्धा नसते. दिल्लीचा बादशहा,



अनुक्रमणिका

नानासाहेब पेशवे, झाशीची राणी लक्ष्मीबाई ही उठावातली नंतरची नेतेमंडळी उठावाच्या प्रारंभी उठावात नव्हतीच !

सारांश, १८५७ च्या घटनेची स्पष्टीकरणे म्हणून गुल्ड १) स्वातंत्र्ययुध्द २) येथल्या पदच्युत राजानी केलेले ब्रिटीशांविरुध्दचे कारस्थान वा ३) शिपायांची भाऊगर्दी यापैकी एकही स्पष्टीकरण पूर्णत्वाने मान्य करीत नाहीत. गुल्ड म्हणतात की, या तिन्ही प्रकारची लक्षणे १८५७ च्या उठावात आढळतात. परंतु या तिनापैकी एकाही कारणाने हा उठाव घडून आला नव्हता. या उठावाचे कारण अगदीच वेगळे आहे. गुल्ड या उठावाचे कारण येथील लोकांच्या त्या काळातल्या विवक्षित मनःस्थितीत पाहतात. त्यांच्या मते ज्या ज्या देशात परक्या सत्तेने तेथला राज्यकारभार हस्तगत केलेला असतो व तेथील जनतेच्या देशी संस्कृतीवर व धर्मावर आक्रमण चालविलेले असते तेथे तेथे १८५७ सारख्याच प्रतिक्रिया घडून आलेल्या आहेत. या प्रतिक्रियाना ते पुनरुज्जीवनवादी ( रिव्हायट्लिस्टिक मुव्हमेंट्स ) चळवळी असे नाव देतात. १८५७ च्या चळवळीचे विश्लेषण करण्यासाठी गुल्ड यानी उत्तर अमेरिकेतल्या रेड इंडियन समाजात घडून आलेल्या 'घोस्ट डान्स' किंवा 'कार्गो कल्ट ' किंवा "नेटिव्हिस्ट' 'यासारख्या'धार्मिक पुनरुथ्थापनाच्या चळवळींचे मुद्देही वापरले आहेत. तसेच या चळवळीत आढळून येणाऱ्या युटोपियन व मिलेनारियन कल्पनांचीही मदत त्यानी घेतली आहे. अशा प्रकारची वेगवेगळया तात्विक प्रमेयांची मदत घेऊन आणि त्या प्रमेयांच्या मदतीने १८५७ च्या घडामोडींचे विश्लेषण करुन गुल्ड अशा निष्कर्षाला येतात की, ब्रिटिश या गोऱ्या लोकांची अजिबात वेगळी संस्कृती जेव्हा येथल्या देशी संस्कृतीच्या सहवासात आली तेव्हा या दोन संस्कृतींच्या परस्परांवरच्या परिणामातून येथील सर्वसामान्य जनतेच्या मनावर जो आघात झाला त्या आघातामुळे येथील जनता परत एकदा आपल्या जुन्या धार्मिक कल्पनांकडे ओढली गेली व त्या कल्पनांच्या आहारी जाऊन तिने ब्रिटिश संस्कृतीच्या विरोधात स्वतःच्या संस्कृतीची अस्मिता ठासून सिध्द करण्याचा प्रयत्न केला. या प्रयत्नाचा प्रगट आविष्कार म्हणजे १८५७ चा देशभरचा ब्रिटिशविरोधी उठाव.

१८५७ च्या हिंदी लढयासंबंधीचा स्वतःचा प्रबंध मांडण्यासाठी गुल्ड यांनी वर म्हटले त्या प्रकारच्या — युटोपियानिझम, मिलेनारिअँनिझम, "घोस्ट'डान्स, 'कार्गोकल्ट' आदी धर्मपंथ—अशा विविध तात्विक माहितीचा वापर केला आहे. यातील बऱ्याच बाबी आमच्या वाचकांना माहित नसण्याचा संभव

असल्याने खाली थोडक्यात त्यांचा परिचय करुन देण्याचा प्रयत्न आम्ही केला आहे.

गुल्ड यानी वापरलेली पहिली महत्वाची कल्पना म्हणजे युटोपिया व युटोपियाचे तत्वज्ञान (युटोपियानिझम) ही होय.

युटोपियाची कल्पना टॉमस मोर या इंग्रज गृहस्थाने १६ व्या शतकांत मांडली. तेव्हापासून आजतागायतपर्यंत अनेक अर्थ या कल्पनेसभोवती जमा झाले आहेत.

मूळात युटोपिया हा शब्द दोन शब्दांच्या एकत्रिकरणातून बनला आहे. 'यू' (u) आणि 'टोपिया' (Topia) असे हे दोन शब्द. यातील 'यू' हा शब्द ग्रीक भाषेत 'ou' आणि 'eu' अशा दोन वेगवेगळ्या प्रकारे लिहिता येतो आणि त्या शब्दाच्या स्पेलिंगप्रमाणे त्याचा अर्थ बदलतो. टोपिया म्हणजे 'ठिकाणा, 'स्थळ' - प्लेस. टोपियाच्या मागचा प्रत्यय जेव्हा 'ओयू', असा असतो तेव्हा 'ओयू चा अर्थ 'न' अथवा 'नाही' असा नकारात्मक असल्याने युटोपिया म्हणजे 'जगाच्या पाठीवर कोठेच जे सापडणार नाही असे स्थान' म्हणजे 'न-ठिकाणा' असा होतो. उलट हा पूर्वप्रत्यय जेव्हा 'इयू' असा असतो तेव्हा 'इयू'चा अर्थ 'उत्तम' सुंदर, न भविष्यती' असा असल्याने युटोपिया म्हणजे पृथ्वीवरचे केवळ नंदनवन किंवा भूस्वर्ग असा होतो. तेव्हा युटोपिया या शब्दात हे दोन्ही अर्थ आहेत. कोठेच कधी पायरवणार नाही असे स्थान आणि स्वर्गासारखे सुंदर असेही स्थान. थोडक्यात 'न-ठिकाणा' आणि 'सु-ठिकाणा' किंवा 'नो-प्लेस' आणि 'गुड-प्लेस' असे दोन्ही श्लेष युटोपिया या शब्दात आहेत.

युटोपिया काळाच्या संदर्भात मांडला जाऊ शकतो किंवा स्थळाच्याही संदर्भात मांडला जाऊ शकतो. किंवा व्यक्तीच्या स्वतःच्या 'स्व' च्या अथवा आत्म्याच्या संदर्भातही मांडला जाऊ शकतो. उदा. युटोपिया रचनाकारांपैकी काही-जण त्यांच्या स्वतःच्या काळातल्या पण त्यांच्या खुद्द राहण्याच्या ठिकाणापासून दूर असलेल्या सुखी समृद्ध अशा सुंदर जगाबद्दल व देशाबद्दल बोलतात. तर दुसरे काहीजण ते जेथे राहात असतात तेथल्याच परंतु वेगळ्या कालखंडातल्या सुंदर काळाबद्दल व जगाबद्दल बोलतात. तर आणखी काहीजण हा तथाकथित सुंदर समृद्ध प्रदेश मनुष्याच्या आत्म्याच्या ठिकाणी पाहतात. 'परमेश्वराचे राज्य तुमच्या आत्म्याच्या ठिकाणी आहे. ते येथे नाही वा तेथे नाही. ते काल नसते वा उद्या नसते. ते आज आणि आत्ता व येथे आहे. 'अंतर्यामी हेच ते ठिकाण' इत्यादी.

पहिल्या प्रकारच्या युटोपियावाल्यांचा परवलीचा ' शब्द ! येथे नाही तेथे'

(समुद्रापलीकडचे सोनेरी पाचूचे नितांत रमणीय बेट. जेथे जरा नाही.संघर्ष नाही, मृत्यू नाही, किंवा आपल्या पुराणातले श्वेतद्विप) दुसऱ्यांचा परवलीचा शब्द 'तेथे नव्हे येथे' पण 'आज नव्हे उद्या' किंवा 'आता नव्हे मग' असा आहे (माणसाच्या आयुष्यातला तो सुंदर काळ पुढे यावयाचा आहे). तिसऱ्यांचा परवलीचा शब्द ते सुंदर जग तेथे नाही आणि येथेही नाही. ते आता नाही आणि मगही नाही. ते तुमच्या माझ्या 'आत' अंतर्यामीच्या ठिकाणी आहे आणि ज्याने त्याने ते स्वप्रयत्नाने मिळवायचे आहे. हा आहे.

तेव्हा काही लोक सुंदर जगाची कल्पना दुसऱ्या काल्पनिक ठिकाणावर प्रक्षेपित करतात. तर आणखी काहीजण तीच कल्पना दुसऱ्या काळावर प्रक्षेपित करतात. तर तिसरे कोणी स्वतःच्या आत्मा किंवा 'स्व' अशासारख्या तत्वावर ती प्रक्षेपित करतात

युटोपियाच्या या तीन भिन्न प्रकारांसाठी तीन भिन्न शब्द वापरले जातात. स्थळाच्या म्हणजेच 'तेथल्या सुंदर जगासाठी युटोपिका हा शब्द वापरण्यात येतो. 'तेव्हाच्या' सुंदर जगासाठी युक्रोनिया - Euchronia ( ग्रीक - क्रोनोस म्हणजे काळ ) तर तिसऱ्या प्रकारच्या सुंदर जगासाठी युसायकिया - Eu-psychia (सायकी म्हणजे मन, मानस, अंतर्याम ) शब्द वापरण्यात येतो.

प्रत्यक्षातल्या नगरांचे व राज्यांचे स्वरूप आणि राज्यशास्त्रात होत गेलेल्या बदलांचे प्रतिबिंब युटोपियाच्या कल्पनेत कसे उतरत होते हे पाहण्यासारखे आहे. उदा. एकोणीसाव्या शतकापर्यंत नगर - राज्ये अस्तित्वात असल्याने असे एखादे सुंदर स्थान हे अपरिहार्यपणेच नगरराज्य असणार असे लोक धरून चालत होते. साहजिकच जेथे सगळे वातावरण सुंदर आणि सुखी आहे. जेथे माणसा-माणसात, माणसात आणि निसर्गात कोठल्याही प्रकारचा ताणतणाव नाही, जथे मनुष्य - पशू आणि निसर्ग एकोप्याने जगत आहेत अशा सर्वतोपरी संतुष्ट ठिकाणाची व दुनियेची कल्पना करणे तेव्हा सुलभ जात होते.

पुढे एकमेकांपासून पृथक्पणे अस्तित्वात राहू शकणाऱ्या नगरराज्यांची कल्पना कालबाह्य झाली अशी नगरराज्ये अदृश्य झाली साहजिकच विसाव्या शतकात जेव्हा नगरराज्यांची कल्पना बाद झाली आणि सारे जगच अनेक प्रकारे परस्परांच्या खूप जवळ आले तेव्हा कोठेतरी पृथ्वीतलावर अस्तित्वात असू शकणाऱ्या श्वेतद्विपाच्या कल्पना कामी येईनाशा झाल्या कारण बहुतेक सर्व जग आजच्या मनुष्याला माहित झाले आहे. जगाच्या या टोकापासून ते त्या टोकापर्यंत कोठलाच प्रदेश आज आपणाला अज्ञात नाही, अशा परिस्थितीत अज्ञात पण सुखी व सुंदर काल्पनिक प्रदेशाची कल्पना करण्यासारखी अज्ञात प्रदेश

न उरल्याने अशा प्रदेशाची कल्पनासुद्धा आपण स्वतःच्या मनाशी रंगवू शकत नाही. टॉमस मोरने जेव्हा आपला जगप्रसिद्ध पहिला युटोपिया लिहिला तेव्हा जगपर्यटनाला फार मोठे प्रोत्साहन मिळाले होते. रोजच्या रोज प्रवासी नवे नवे प्रदेश शोधून काढीत होते. प्रवासवर्णनातून त्यांची माहिती देत होते. हा काळ तोवर अज्ञात असलेल्या नव्या नव्या प्रदेशांच्या व संस्कृतींच्या शोधाचा असल्याने अशा एखाद्या अद्‌भुतरम्य ठिकाणाच्या नव्या शोधाची कल्पना आपले मन रंगवू शकत होते. म्हणून स्थळाशी संबंधित युटोपिया लिहिले जात होते.

स्थळ व काळाच्या संदर्भातल्या तीन प्रकारच्या युटोपियांची माहिती आपण पाहिली.

आता प्रश्न असा पडतो की, जे कधीच कोठे सापडणार नसते अशा रम्य ठिकाणाचे व सुंदर दुनियेचे चित्र मनुष्याने स्वतःशी का पाहावे? कोठल्या कारणासाठी, कोठली. मानसिक गरज भागविण्यासाठी मनुष्ये अशा प्रकारच्या 'सुंदर नव्या दुनियेचे' चित्र स्वतःशी रंगवितात? मानवजातीच्या या व्हिजन्स-मागील हेतुपरंपरा कोणती?

ही हेतुपरंपरा (मोटिव्हेशन्स, मोटिव्हेशन्स आणि कॉझेशन्स वा कारण-परंपरा यात आपण फरक करीत आहोत. वाऱ्याच्या झोताने जेव्हा खिडकी बंद होते तेव्हा 'वारा' हे खिडकीच्या बंद होण्याचे कारण असते. उलट वाऱ्याचा झोत लागून थंडी होऊ - नये म्हणून आपण स्वतःच जेव्हा खिडकी बंद करतो तेव्हा तेथे हेतूचा प्रभाव असतो मनुष्याच्या व्यवहाराचा विचार करताना हेतु-परंपरेच्या घटकाला अधिक महत्व द्यावे लागते.) कोठल्या प्रकारची असते हे शोधून काढण्यासाठी युटोपियावाचक स्वप्नांचे स्वरूप पाहावे लागेल. तसेच कोठल्या विशिष्ट भौतिक व सामाजिक-ऐतिहासिक परिस्थितीत ही स्वप्ने रंगविली जातात हे सुद्धा पहावे लागेल.

टॉमस मोर याने जेव्हा आपला युटोपिया हा या प्रकारचा पहिला ग्रंथ लिहिला तेव्हा अनेक युरोपीय प्रवासी युरोपबाहेरील प्रदेशांचा प्रवास करुन स्वदेशी परतले होते. परतल्यावर या तोवरच्या अज्ञात प्रदेशांबद्दल अनेक भल्या-बुऱ्या कल्पना त्यानी आपल्या लोकात प्रसृत केल्या होत्या. त्या परक्या लोकांच्या हकीगती ऐकून युरोपीय लोकांची कल्पनाशक्ती चाळवली जात होती. व त्यातून 'येथे नव्हे तर तेथे' आणि 'आता नव्हे तर मग' या जातीच्या नव्या सुंदर जगाची चित्रे जन्मास आली.

यावरून असा एक निष्कर्ष आपणास काढता येतो की, जेव्हा अजिबात परक्या संस्कृतीशी व तेथील रहिवाश्यांच्या अनोख्या जीवनक्रमाशी दुसऱ्या



अनुक्रमणिका



एखाद्या संस्कृतीचा परिचय होतो तेव्हा त्या दुसऱ्या संस्कृतीला मानसिक धक्का बसतो. आणि ती संस्कृती वेगळचा व तिच्यापेक्षा अधिक सुंदर, यशस्वी व उदात्त जगाची चित्रे रंगवू लागते.

याच परिस्थितीची उलटी बाजू अशी की जेव्हा, एखादी मागास संस्कृती तिच्यापेक्षा तंत्रवैज्ञानिक आणि इतर बाबतीत अधिक प्रगत असणाऱ्या संस्कृतीच्या संपर्कात येते तेव्हा त्या परकी संस्कृतीच्या दबावाला तोंड देता देता तसे तोंड देता यावे म्हणून स्वतःच्या यशस्वी भवितव्याची अनेक प्रकारची पर्यायी स्वप्ने ती रंगविते. उदा. ब्रिटिशानी मेलानेसियन लोकांवर जेव्हा स्वतःचे प्रभुत्व प्रस्थापित केले आणि मेलानेसियन लोक व ब्रिटिश सत्ता यांचा जेव्हा संघर्ष घडू लागला तेव्हा स्वतःच्या भावी सुंदर काळाबद्दल जी चित्रे मेलानेसियन लोकांनी रंगविली त्या चित्रांत स्वर्गातून तऱ्हेतऱ्हेच्या खाद्य पदार्थांनी व युरोपियन तऱ्हेच्या चैनीच्या वस्तूंनी भरभरून येणाऱ्या बोटीना सर्वात अधिक महत्व होते. कारण मेलानेसियात वास्तव्य करणाऱ्या ब्रिटिश लोकांच्या सोयीसाठी ब्रिटनहून येणाऱ्या तशा बोटी त्यानी पाहिल्या होत्या. पण ब्रिटन हा देश त्याना माहित नसल्याने व ब्रिटिश लोकांचा गोरा रंग पाहून त्यानी असे ठरविले की, आपले मृत पूर्वज ज्या श्वेतद्विपात राहात आहेत तेथून ते अशा बोटी भरुन पाठवितील. अशाच प्रकारची सुंदर जगाची कल्पनाचित्रे आपणास चिनी लोकांच्या वाङ्मयातही दिसून येतात. मात्र चिनी संस्कृती भौतिक व सांस्कृतिक बाबतीत मेलानेसियन रहिवाश्यांपेक्षा अधिक वरच्या स्तरावर असल्याने त्यांच्या कल्पनाचित्रात पर्वजानी पाठविलेल्या बोटींऐवजी सर्व प्रकारच्या वैभवाने समृद्ध असलेल्या अनेक मजली महालांची चित्रे आहेत.

एका बाजूने विचार केल्यास युटोपिया हे कधीही प्रत्यक्षात येऊ न शकणाऱ्या स्वप्ननगरीचे काल्पनिक चित्र असते. ही गोष्ट जरी खरी असली तरी दुसऱ्या बाजूने ही युटोपियी कल्पनाचित्रे म्हणजे त्या त्या ठिकाणच्या प्रचलित समाज-स्थितीवरची टीका असतात, व ती स्थिती सुधारण्याची मार्गदर्शक सूचनाही ती असतात असे अधिक विचारांती दिसून येते. तेव्हा युटोपियाच्या कल्पना-चित्राना केवळ स्वप्नरंजने व फॅन्टसी म्हणून आपण उडवून लावता कामा नये. युटोपियन स्वप्ने रंगविणारे लोक एकाच वेळी त्यांच्या स्वतःच्या समाजातील दोषांवर आणि उणीवांवर बोट ठेवित असतात आणि तो भ्रष्ट समाज सुंदर बनविण्यासाठी त्यांच्या दृष्टीने काय करावयास हवे असते ते देखील सूचित करीत असतात आणि युटोपिया या शब्दाच्या मूळ अर्थाशी हे सुसंगतच आहे.



अनुक्रमणिका

युटोपियाच्या मूळ अर्थाप्रमाणे युटोपिया म्हणजे एक खरा परंतु विलक्षण असा अज्ञात देश.

युटोपियांचा विचार करताना आणखीही एक चूक आपण करीत असतो. आपण असे धरून चालतो की, युटोपिया हे निष्कलंक व निर्दोष समाजाचे कल्पनाचित्र असते. परंतु ते खरे नाही. सगळेच युटोपिया अशा प्रकारच्या परिपूर्ण समाजाचे चित्र रंगवित नाहीत. आणि असे चित्र रंगविता तरी कसे येईल? सर्वांगपरिपूर्णतेचा तुमचा निकष माझ्या निकषाशी जुळेलच असे नाही. तेव्हा या प्रकारच्या सामाजिक कल्पनाचित्रांबद्दल आपणास असे म्हणता येईल की, ज्या समाजाने हे कल्पनाचित्र मांडलेले असते त्या समाजातील सार्थ व सफल जीवनरहाटींपेक्षा जर वेगळ्या प्रकारच्या सार्थ सफल जीवनरहाटींचे सूतोवाच त्या कल्पनाचित्रात केले गेले असेल तर त्या कल्पनाचित्राला युटोपिया हे नाव लावावयास कसलाच प्रत्यवाय असू नये. हा दृष्टीकोन आपण स्वीकारला की, युटोपिया म्हणजे काही विशिष्टच प्रकारची समाजव्यवस्थाविषयक कल्पनाचित्रे ही भूमिका आपण सोडून देऊ. आणि मग प्रचलित समाजव्यवस्थेपेक्षा वेगळी समाजव्यवस्था सूचित करणारे कोठलेही कल्पनाचित्र युटोपियाच असतो असे आपण मानू लागू. हे युटोपिया उद्दिष्ट कधी उघड असेल. तर कधी प्रच्छन्नपणे असेल. ते कसेही असो या प्रकारच्या लिखाणाची दाद घेतली जाणे केव्हाही श्रेयस्कर आहे.

युटोपियाच्या बाबतीत येथे आणखी एक स्पष्टीकरण आवश्यक आहे. युटोपिया म्हणजे काय हे जसे आपण स्पष्ट केले तशाच प्रकारे ते काय नाही हे सुद्धा आपण स्पष्ट केले पाहिजे. एक तात्विक कल्पना म्हणून युटोपियाच्या कल्पनेचा विचार आपण करित आहोत तेव्हा ती वाजवीपेक्षा जास्त ताणली जाणार नाही हे आपण पाहिले पाहिजे. कारण फार ताणल्यास ती कल्पना अगदी भोंगळ बनेल व तात्विक चर्चेच्या कामी येणार नाही. हे अर्थात सर्वच प्रकारच्या तात्विक संकल्पनांना (कन्सेप्टसना) लागू आहे. कोठलीही तात्विक कल्पना जर वाजवीपेक्षा अधिक ताणली आणि एकसारख्या दिसणाऱ्या सगळ्याच लहानमोठ्या घटना तीत बसवू पाहिल्या तर ती पोकळ बनते आणि कशाच्याच उपयोगी येत नाही. असे झाले की, भोवतीच्या वस्तुस्थितीच्या विश्लेषणाचे बौद्धिक हत्यार हा जो त्या कल्पनेचा प्राथमिक उपयोग तोच बाद होतो. म्हणून अशा तात्विक कल्पना बरोबर बंदिस्त करून घ्याव्या लागतात. तात्विक कल्पना बंदिस्त करण्याचा उत्तम मार्ग म्हणजे त्या कल्पनांच्या विरोधी कल्पना त्यांच्या बाजूस मांडणे होय.



अनुक्रमणिका



असे केले की, मूळ कल्पना म्हणजे काय नाही हे स्पष्ट बनते. आणि नसता बौद्धिक गोंधळ टाळला जातो.

एका बाजूने पाहिल्यास युटोपिया म्हणजे त्या त्या ठिकाणच्या प्रचलित समाजव्यवस्थेवरची टीका होय. ही टीका शाब्दिक असते. किंवा शब्दचित्राच्या स्वरूपात ही टीका असते हे ध्यानात घेतल्यास इतरसुद्धा अशाच प्रकारची काही शब्दचित्रे चुकून युटोपियात गणली जाण्याची भिती नाकारता येत नाही. उदा. प्रचलित समाजाविषयीचे व्याजोतीपूर्ण औपरोधिक लिखाण वगैरे युटोपियासारखे दिसू शकते. परंतु ते युटोपिया मात्र नव्हे व्याजोक्ती, वक्रोक्ती इत्यादी उपहासपूर्ण लिखाणातला उपहास हा उपहासासाठी असतो. केवळ करमणुकीपलीकडे इतर कसलाही स्तुत्य हेतू त्यात नसतो आणि प्रचलित समाजस्थितीचा उपहास करण्यापलिकडे किंवा त्या समाजाची चेष्टा करून त्यास मनाने नकार देण्यापलीकडे अधिक काहीही त्यात साधले जात नाही.

युटोपिया आणि या प्रकारच्या व्याजोक्ती आणि वक्रोक्ती यात फरक हा की, युटोपियी लिखाण अधिक गंभीर असते. चेष्टा आणि वाचकाला हसविणे हा त्याचा हेतू नसतो. सभोवतालच्या समाज व्यवस्थेला त्यात नकार असतो पण दुसऱ्या कोठल्या प्रकारच्या समाजव्यवस्थेला लेखकाचा होकार असू शकेल हे सुध्दा त्या नकारा बरोबरच तेथे आलेले असते. याच संदर्भात जार्ज ऑर्वेल सारख्यांचा दुःस्वप्नवाचक शब्दचित्रांही विचार करावयास हवा. ऑर्वेलची १९८४ ही भावी काळासंबंधीची कादंबरी पुढे कोठल्या प्रकारचा समाज भूतलावर येऊ शकेल याचे सूतोवाच करते. ऑर्वेलच्या विचारात, हा समाज भयकारी असेल त्यात माणसे ही ठराविक चालनाना फक्त पूर्वनिश्चित प्रतिसाद देऊ शकणारी व ज्यांचे आंतरिक स्वातंत्र्य-नाही म्हणण्याचे स्वातंत्र्य काढून घेतले गेले आहे अशी यंत्रमनुष्ये ( रोबो ) असतील, सगळा समाज लष्करी बराकीभत बनलेला असेल. या प्रकारच्या भावी अरिष्टसूचक व दुर्धर समाजाचे चित्रण करणाऱ्या दुःस्वप्नसम लिखाणाना इंग्रजी शब्द Dystopia डिस्टोपिया ( Dys म्हणजे अनिष्ट, वाईट, प्रतिकूल, निंदाव्यंजक ) असा आहे. सांगायचे असे की, व्याजोक्ती, वक्रोक्ती, डिस्टोपिया आणि युटोपिया हे वेगवेगळे प्रकार आहेत.

ऑर्वेलप्रणित काल्पनिक अरिष्ट नगरींच्या शब्दचित्रात सुध्दा युटोपियाप्रमाणेच प्रचलित समाजाच्या दोषांवर टीका असते. प्रचलित समाजाच्या उणीवांची वाच्यता असते. परंतु युटोपियी शब्दचित्रांचा जो महत्वाचा दुसरा विशेष त्याचा तेथे पूर्ण अभाव असतो. युटोपियामध्ये चालू नतद्रष्ट समाजाच्या



अनुक्रमणिका

तुलनेत जो हवाहवासा वाटेल अशा अन्य परस्थ सुंदर समाजाचे शब्दचित्र अपरिहार्यपणे दिलेले असते. अरिष्टनगरीच्या शब्दचित्रात नव्या समाजाचे जे चित्र असते ते नतद्रष्ट व त्याज्य समाजाचे चित्र असते. अनुकरणीय समाजाचे नव्हे.

युटोपियाशी साम्य दाखविणारे आणखिही काही वाङ्मय प्रकार आहेत. उदा. निरनिराळ्या प्रकारच्या मिथ्स् वा यक्षनगरींच्या कथा; तसेच विज्ञानकथा या सुध्दा वरवर पाहिल्यास युटोपियांसारख्या वाटतात. कारण काल्पनिक समाजांचे गुणवर्णन करता करता उलटया बाजूने स्वतःच्या समाजाचे दोष सुद्धा या कथा बोलत असतात. परंतु ज्या कारणासाठी व्याजोक्ती आणि वक्रोक्ती सारख्या लिखाणास युटोपिया हा शब्द लावण्यास आपण नकार दिला त्याच कारणासाठी हेही लिखाण आपण युटोपियी म्हणू शकणार नाही. यात भले स्वतःच्या चालू समाजावर भरपूर टीका असेल परंतु नवा उत्कृष्ट व सार्थ समाज कसा असू शकतो याची जी मार्गदर्शक विधायक चर्चा खऱ्या युटोपियात असते तसले काही सुद्धा या विज्ञान कथात आढळत नाही.

युटोपियासारखी स्वतःच्या चालू समाजावर दोषारोप करणारी कल्पनाचित्रे रचावयास मनुष्य का तयार होतो. हाही एक महत्वाचा प्रश्न आपण उपस्थित केला आहे. युटोपियी शब्दचित्रे ही स्वतःच्या समाजावरची टीकाचित्रे असतात. युटोपिया रचणारा लेखक एकीकडे स्वतःच्या समाजातले दोष दाखवून त्यावर टीका करीत असतो व दुसरीकडे त्याच वेळी एका दुसऱ्या परस्थ उदात्त व सुंदर समाजाची कथा देखील सांगत असतो. तेव्हा युटोपियाना एका अर्थाने सामाजिक टीकेचा प्रकार असेही म्हणता येइल.

युटोपियाला जर आपण सामाजिक टीकेचा एक प्रकार मानले तर टीकेचे कारण म्हणून त्या समाजातील सामाजिक दडपणाकडे आपण पाहू शकू. युटोपिया म्हणजे प्रचलित समाजव्यवस्थेवरची सर्व प्रकारची टीका या अर्थाने जर युटोपियांच्या लिखाणाकडे आपण पाहिले तर व्याजोक्ती, वक्रोक्ती, विध्वंसवाद ( निहिलिझम - पारंपारिक व रुढ आचारविचार आणि नीतिधर्म यांचा धुस्याम करणारी विचारसरणी; जे जे जुने ते ते मोडा, फोडा, तोडा असे सांगणारी वैचारीक भूमिका ) आणि शेवटी युटोपिया अशी ही एक दुःसह प्राप्त परिस्थितीसंबंधिची चढत्या क्रमाची वैचारिक प्रतिक्रीया आहे असेही युटोपियाबद्दल म्हणता येईल.

Soiji Nuita नावाच्या जपानी विद्वानाने युटोपियन विचारधारांबद्दल बऱ्याच जागा म्हटले आहे की, युटोपिया हया प्रचलित समाजव्यवस्थेवरच्या

टीका असतात. मनुष्ये युटोपिया का रंगवितात याचे स्पष्टीकरण देताना नुइटा लिहितात की, मनुष्य हा स्वप्ने रंगवून जगणारा प्राणी आहे. ( " जो मनुष्य स्वप्ने रंगवू शकत नाही तो जगूदेखिल शकत नाही. - अर्न्स्ट टोलर ) कारण त्याची जाणीवशक्ती - energy of Conscicusness त्याला स्वप्ने रंगविण्यास प्रवृत्त करते. अर्थात जाणीवशक्तीची इतरही कार्ये आहेत. परंतु युटोपियांसारखी सामाजिक टीका करीत राहणे हे जाणीवशक्तीचे एक महत्वाचे कार्य आहे. जाणीवशक्ती फारशी तीव्र नसते तेव्हा ही टीका व्याजोक्तीच्या स्वरुपाची असते. आधिक तीव्र असेल तर वक्रोक्ती व याच चढत्या क्रमाने विध्वंसन व शेवटी युटोपियासारखे लिखाण घडते. नुइटा जाणीवशक्तीच्या प्रतिक्रियेचे अशा प्रकारे चार टप्पे मानतात. पहिला टप्पा व्याजोक्ती, दुसरा वक्रोक्ती तिसरा विध्वंसवाद व चवथा युटोपिया लेखनाचा.

मनुष्याची जाणीवशक्ती टप्याटप्याने पुढे सरकते. पण मुळात जाणीवशतीला पुढे सरकावे असे का वाटते. असा एक प्रश्न येथे उपस्थित होतो. नुइटा यानी त्याचेही उत्तर दिले आहे. वैफल्य ( डिस्पेअर ) हा मानवी जीवनाचा अटळ भोग आहे आणि वैफल्यग्रस्त होऊ शकण्याच्या संवयीतून हे घडते असे ते म्हणतात. मनुष्यजन्म आणि मानसिक विफलता या दोन गोष्टी अविभाज्य आहेत. कारण प्रारंभापासून ते शेवटपर्यंत मानवी आयुष्य अनिश्चिततेने ओतप्रत भरलेले आहे. या अनिश्चन आयुष्यक्रमात मृत्यू हीच तेवढी एक अशी बाब आहे की, जी निश्चित आहे. बाकी कोठलीही बाब निश्चित नाही. आपला कोठलाही उद्देश निश्चितपणे सफल होईलच अशी खात्री आपण आपणास देऊ शकत नाही. इतरसुद्धा कोणी तशी खात्री आपणास देऊ शकत नाही.

मानवी आयुष्याच्या बाबतीत फक्त मृत्यू तेवढा निश्चित आहे. पण मृत्यू कोणालाही नको असतो. म्हणून मग आयुष्याची अनिश्चितता आपण स्विकारतो. अगदी नाइलाज म्हणून. कारण आयुष्य न स्विकारावे तर मृत्यू स्विकारणे भाग आहे. दुसरे काही करता येत नाही, आपला इलाज नाही म्हणून नाइलाजाने आपण जगण्याकडे वळतो. कारण जगणे म्हणजे अनिश्चितता स्वीकारणे. ( " मन हताश करणाऱ्या परिस्थितीमध्ये जगून पाहण्याचा प्रयत्न जर तुम्हास करायचा असेल तर त्यासाठी तुमच्यापाशी मोठ्या ताकदीचे मन हवे" – इति किर्केगोर ).

अनिश्चिततेने वेढलेले आयुष्य किंवा निश्चित पण सर्व संपविणारा मृत्यू असे दोनच पर्याय मनुष्यापुढे असता। आणि एक प्रकारच्या नाइलाजाने,

अगतिकता आणि वैफल्याने मनुष्य जगण्याकडे वळतो. पण या वैफल्यमय जगण्याचे दुसरे नाव आहे एकाकीपणा ( Solilude ) हे. कारण जेव्हा आपण आपल्या आयुष्याच्या – या वैफल्यपूर्ण अटळ भोगाचा विचार करू लागतो तेव्हा आपणाला असे दिसून येते की, या जगात आपली स्थिती सर्वस्वी निराधार व एकटी आहे. आपणाला कुणी जबाबदार नाही आणि आपण-सुद्धा कुणाला जबाबदार नाही. सार्त्रच्या शब्दात सांगायाचे तर "येथील आपल्या असण्यानसण्याला कसल्याही प्रकारचे कारण नाही. किंवा कोठल्याही प्रकारची सबब नाही. मनुष्यप्राण्याला स्वतंत्र असण्यावाचून गत्यंतरच नाही; स्वातंत्र्य ही त्याला दिली गेलेली शिक्षा आहे असे जेव्हा मी म्हणतो तेव्हा मला असे म्हणायचे असते की, आपण सगळे जीव या जगात अगदी एकटे आहोत. आपण कुणाच्या इच्छेने जन्म घेतलेला नाही. व या अर्थाने आपण सारे आपल्या जन्माआधीच बाद ठरविले गेलो आहोत. उलट या जगात एकदा का आपले पदार्पण झाले की, मग आपल्या हातून येथे जे जे काही घडू शकते त्या सर्वाला आपण एकटेच जबाबदार असू."

तेव्हा अनिश्चितपणातले जगणे नको असेल व निश्चित असेच काही हवे असेल तर फक्त मृत्यूच तेवढा निश्चित आहे आणि मृत्यू नको म्हणून केवळ नाइलाजापोटी जेव्हा आपण जगण्याच्या बाजूने कौल देतो तेव्हा दुसरा प्रश्न जो उभा राहतो तो म्हणजे आता आपण कसे जगावे हा होय. जगावे ही इच्छा ही जरी मनाची पहिली अवस्था असते असे आपण मानले तर 'कसे जगावे?' हा प्रश्न ही त्याच्या पुढची अवस्था आहे असे आपण म्हणू शकतो. कारण आता आपण आपल्या जाणीवशक्तीचा वापर करु पाहत असतो.

परत ही जाणीव तरतरीत व तीक्ष्ण असेल किंवा मरगळलेली व मंद असेल. जर ती मंद असली तर तिच्या उदिष्टाच्या आड येणारे सामाजिक अडथळे तिला अस्वस्थ करतील पण कार्योद्युक्त करणार नाहीत. समजा ही जाणीव थोडी अधिक तरतरीत असेल तर तिला तिच्या वाटेत येणाऱ्या अडथळ्यांचा संताप येईल; आणि त्या संतापाची परिणती विध्वंसन प्रवृत्तीत होईल.

एका अर्थी हा विध्वंसनवाद म्हणजे उलट बाजूने निर्मिती प्रक्रियेची सुरवात असे देखील कोणी म्हणू शकेल. कारण विध्वंसनात नव निर्माणाची बीजे असू शकतात. आपण विध्वंसनाला उद्युत होतो तेव्हा नव्याच्या इच्छेने व अपेक्षेने जुने मोडून टाकण्याचा प्रयत्न करीत असतो. मात्र विध्वंसनवादात जुन्याच्या मोडतोडीची धारणा असली तरी कोठल्याही प्रकारच्या नव्या रचनेच्या विधायक सूचना त्यात नसल्याने विध्वंसनवादाची परिणती केवळ विध्वंसापाशी थांबते

होते. विध्वंसनवादात सामाजिक अडथळ्यांना ( सोशल वॅरिअर्सला ) विरोध करण्याचे प्रोत्साहन जरी असले तरी कोठल्या प्रकारचे आयुष्य हे सर्व दृष्ट्या सार्थ आयुष्य असू शकेल या प्रश्नाचे यत्किंचितही उत्तर विध्वंसनवाद देऊ शकत नाही. म्हणून जी जाणीवशक्ती याही टप्यापेक्षा अधिक तीव्रतम असते ती आणखी पुढे जाऊन ज्यात विध्वंसन आणि नवरचना या दोन्हींचा समन्वय साधला आहे असे युटोपियादाखल काहीतरी निर्माण करु पहाते.

अर्थात विध्वंसनवाद आणि रचनात्मक युटोपिया यांच्या अधेमधेसुद्धा एक स्थिती कोठे कोठे आढळू शकते. उदा. जाणीवशक्तीच्या वाटेतले सामाजिक अडसर इतके काही प्रबल व प्रखर असतात की, त्यांना प्रतिकार करण्याचा विचारही जाणीवशक्तीच्या मनात येत नाही. अशा वेळी जाणीवशक्ती त्या अडथळ्यांपुढे नांगी टाकते, मग जाणीवशक्ती स्वप्नरंजनासारख्या पलायन-वादाकडे वळते. अर्थात प्रत्येक पलायनवाद हा पराभवच असतो व निरर्थक ठरतो असे म्हणता यावयाचे नाही. समजा एखाद्या समाजातील राजकीय-आर्थिक सामाजिक परिस्थिती इतकी दुर्धर असेल की, त्या परिस्थितीला विरोध करावा अशी इच्छा असूनसुद्धा एखाद्या मानवतावाद्याला त्या परिस्थितीविरुद्ध दंड थोपटता येत नाहीत. अशा वेळी घाबरून तेथील अमानुष नेतृत्वाबरोबर आणि संस्थांबरोबर सहकार्य करण्याऐवजी असा मानवतावादी समजा समाजविन्मुख झाला तर त्याचे हे वर्तन तत्वतः पलायनवादी वाटले तरी तेथल्या 'जाणीवेने' दडपशाहीशी सहकार्य न करून स्वतःची प्रखरताच व्यक्त केली आहे. असे परिणामाच्या दृष्टीने आपण म्हणू शकतो.

विरोधी परिस्थितीला तोंड देण्याचा जाणीवशक्तीचा हाही एक प्रकार झाला. पण समजा की, जाणीवशक्तीच्या आड येणारे अडसर अधिकच प्रखर आहेत अशा वेळी जाणीवशक्ती कोठली प्रतिक्रिया व्यक्त करील ? नुइटा म्हणतात की, विरोधी परिस्थितीशी मुकाबला करण्याचा कोणताच उपाय जेव्हा जाणीवशक्तीशी नसतो तेव्हा ती जाणीवशक्ती आपला विरोध बोधकथांतून किंवा वक्रोक्तींमधून व्यक्त करते. कारण? आता फक्त तेवढेच करता येणे तिला शक्य असते. अर्थात यावर कोणी असे म्हणेल की, विध्वंसनापेक्षा वक्रोक्ती ही प्रतिकूल सामाजिक परिस्थीतीच्या बाबतीतली अगदीच सौम्य प्रतिक्रिया झाली तर नुइटांच्या मते तसे नाही केवळ विध्वंसना-ऐवजी प्रतिकूल सामाजिक परिस्थितीबद्दलचा स्वतःचा राग मनुष्ये जेव्हा वक्रोक्ती लिहून व्यक्त करू पाहातात तेव्हा त्याचा अर्थ हा असतो की, विरोधी परिस्थिती फारच प्रखर होती व तिच्यापुढे कुणाचे काही चालत नव्हते.



अनुक्रमणिका

सारांश, नुइटांच्या मते केवळ कसेतरी जीव टिकवून राहणे, विध्वंसन करू पाहणे, पलायनवाद स्वीकारणे, बोधकथा वा वक्रोक्ती लिहिणे या सर्व कृती म्हणजे सामाजिक अडथळचांना मानवी जाणीवशक्तीने वा बुद्धीने दिलेली चढत्या क्रमाची उत्तरे होत.

आणखीसुद्धा एक प्रतिक्रिया मनुष्याकडून व्यक्त केली जाते. ही प्रतिक्रिया म्हणजे युटोपिया रचले जाणे. युटोपिया हे सामाजिक अडथळचांना दिले गेलेले उत्तर आहे. परंतु येथे मनुष्य सामाजिक तटबंदीच्या पलिकडे जाऊन तेथून तटबंदीचा भेद करण्याची युक्ती शोधित असतो. आणि हाच युटोपिया होय.

युटोपिया ही केवळ स्वप्नरंजने नव्हेत. अर्थात युटोपियासारखी दिसणारी स्वप्नरंजनेसुद्धा असू शकतात. परंतु युटोपियाची जी एक व्याख्यावर आपण दिली आहे ती जर ध्यानात घेतली तर असे दिसून येईल की, मानवी जाणिवेला सामाजिक परिस्थिती जेव्हा अतिशय दुर्धर आणि विकट वाटते तेव्हा त्या परिस्थितीतून बाहेर पडण्यासाठी ती जाणीवशक्ती युटोपियासारखी रचनात्मक कल्पनाचित्रे रचते.

नुइटांच्या भूमिकेवर एक आक्षेप असा घेता येईल की, जी गोष्ट पुराव्यानिशी सिद्ध करावयाची आहे तिचा वेगळा पुरावा न देता आपला सिद्धांत हाच तो पुरावा आहे असे सांगण्याचा प्रयत्न ते करतात. उदा. नुईटा म्हणतात की, मनुष्य आणि त्या मनुष्याच्या आत्मसाफल्याच्या आड येणारे सामाजिक अडसर या दोघांच्या परस्पर संघर्षातून त्या अडसरांच्या कमीजास्त तीव्रतेनुसार प्रथम विध्वंसकता, नंतर त्या समाजावर टीका करणारे वक्रोक्तीपूर्ण लिखाण, नंतर सामाजिक बोधकथा व दोषदर्शी समाजावर टीका करणारे व त्याच वेळी नव्या अधिक सफल समाजाची सूचना देणारे युटोपियादाखल लिखाण निर्माण होते. मनुष्याच्या आत्मसाफल्याच्या आड येणारे सामाजिक अडसर सौम्य असतात तेव्हा तेथील मनुष्ये तो समाज मोडून टाकावयास उद्युक्त होतात. ते अडसर अधिक तीव्र बनले आणि विध्वंसन जमू शकत नाही तेव्हा समाजावर वक्रोक्तीपूर्ण टीका करतात वगैरे. वगैरे. ' येथे नुइटा टीकेचा प्रकार हा सामाजिक अडसरांच्या कमीजास्त तीव्रतेचा पुरावा मानतात. वस्तुतः एखादा वेगळा स्वतंत्र पुरावा देऊन अडसरांची कमीजास्त तीव्रता आणि त्यावर अवलंबित टीकेचा प्रकार [illegible] ती मांडून दाखवायास हवे होते. ते उलटसुलट चक्राकार युक्तिवाद करताना दिसतात.

[illegible] अगळे [illegible] नुइटांच्या युटोपिया संबंधीचा एक मुद्दा आणि

स्वतःही वर मांडला आहे. नुइटा म्हणतात की, एखाद्या समाजातील लोकाना तो समाज जेव्हा दुर्धर व संकटप्राय वाटू लागतो तेव्हा तेथील लोक संपन्न परंतु काल्पनिक पर्यायी समाजाची कल्पनाचित्रे स्वतःच्या मनाशी रेखाटू लागतात. हा काल्पनिक समाज कोठकोठल्या बाबतीत संपन्न व सुखी आहे आणि सुखी बनण्यासाठी तो कोणते मार्ग चोखाळीत आहे याचे जे काल्पनिक चित्र त्या युटोपियात असते ते चित्र म्हणजे एका बाजूने त्या विशिष्ट प्रत्यक्ष समाजाच्या जीवनरहाटीवरची टीका असते आणि दुसऱ्या बाजूने तो समाज सुखी बनावयाचा असेल तर त्याने कोठल्या दिशेने प्रयत्न चालविले पाहिजेत याचे दिग्दर्शनसुद्धा असते. युटोपियाच्या संबंधात आपण सुद्धा असेच म्हणत आहोत.

युटोपिया ही प्रस्थापित समाजव्यवस्थेवरची टीका असते असे वर आपण पाहिले. या दृष्टीने विचार केल्यास म्हणजेच सामाजिक टीकेच्या मुद्याला प्राथमिक महत्व दिल्यास युटोपिया या टीका असतात असे म्हणता येईल. येथे आपण युटोपियामागच्या धारणेला महत्व दिले. धारणेप्रमाणेच त्या युटोपियात जो आशय आलेला असतो, जे कल्पनाबंध (Motifs) येतात त्याच्या आधारे सुद्धा युटोपियांचा विचार करता येईल. त्याचप्रमाणे एकाद्या विशिष्ट समाजातल्या वैचारीक दृष्टीकोनांचो दिशा वा पद्धती म्हणूनही युटोपियांकडे पाहता यईल. असो.

युटोपियाच्या लिखाणाला जर आपण सामाजिक टीका मानले तर आपणाला दोन गोष्टी कबूल कराव्या लागतील. एक तर आपणाला असे कबूल करावे लागेल की, अशी सामाजिक टीका एखाद्या समाजात होऊ शकते याचा अर्थ तो समाज किंवा तेथील शास्ते अशा टीकेच्या बाबतीत सहिष्णू असतात, आणि अशी टीका केली म्हणून कोणास शिक्षा दिली जाणार नाही ही तेथे खात्री असते. व दोन, तो समाज अगदीच कामातून गेलेला नाही; प्रयत्न केल्यास तो सुधारता येण्याची आशा आहे असे तेथील लोकाना वाटते. अशी सुधारणा होऊ शकेल असे जर युटोपियावाल्याना वाटले नसते तर युटोपिया मांडण्याच्या ते फंदातसुद्धा पडले नसते. मात्र सुधारणांचा हा जो मुद्दा येथे आपण घेतला आहे त्याच्या बाबतीत सावधगिरी बाळगली पाहिजे. कारण युटोपियावाल्याना ज्या सुधारणा वाटतात त्या अलिप्तणे पाहिल्यास खरोखरीच्या सुधारणा असतीलच असे नाही. कदाचित युटोपियावाल्यानी त्या समाजासाठी सुचविलेले बदल खरोखरीच्या सुधारणा असतील. अथवा सुधारणा नसतील; ते प्रतिगामी विचारसुद्धा असतील.



अनुक्रमणिका

ज्या प्रकारच्या लिखाणाला सुसंबद्ध यूटोपियाचे लिखाण म्हणता येईल तसे या विषयावरचे मुद्देसूद व सुसंबद्ध लिखाण फक्त यूरोपमध्येच खऱ्या अर्थाने आढळते. आपल्याकडे युरोपिय युटोपियाच्या जातीचे ग्रंथ नाहीत. मात्र इतस्ततः विखुरलेल्या स्वरूपातील कल्पना म्हणून असे विचार आपल्यासुद्धा वाङ्मयात आढळू शकतात. उदा. बौद्ध वाङ्मयात बृहत सुखावतीव्यूह नावाचे एक सूत्र आहे. त्यात सर्वांग-सुंदर स्वर्गाची कल्पना मांडली गेली आहे. तसेच मोक्षलोकाची कल्पनासुद्धा आपणाकडे आहे. म्हणजे उदात्त आणि सुंदर व सुखी समाजाच्या कल्पना आपणाकडे अजिबात नाहीतच असातला भाग नाही.

युटोपियाच्या विषयात आपणाला येथे अधिक खोल जाण्याची गरज नाही. युटोपियाची एक तात्पुरती व्याख्या केली की झाले. युटोपिया म्हणजे विचाराची काही एक दिशा. हे विचार कधी तात्विक विचारसरणीत मांडलेले असतील. कधी प्रतीकांच्या रूपात ते असतील. कधी केवळ फॅन्टसींच्या रूपात ते असतील. तर कधी ती तेथल्या कोणा वजनदार व्यक्तीची स्वप्ने असतील. या सर्वांना आपण विचारसरणी असा सर्वसाधारण शब्द वापरू शकतो. या सुखी स्थळा-बद्दलच्या किंवा काळाबद्दलच्या विचारसरणी असतात. ( विचारसरणी म्हणजे अर्थात आयडिऑलॉजीज् नव्हेत. आयडिऑलॉजींच्या प्रस्थापित व्याख्येप्रमाणे आयडिऑलॉजी प्रस्थापित समाजव्यवस्था कायम टिकवून धरण्यासाठी धडपडतात. तर युटोपिया तीत बदल घडविण्याचा विचार करतात. हा या दोघातला महत्त्वाचा फरक. ) इतर अनेक प्रकारच्या बौद्धिक विचारसरणी त्या त्या सामाजिक वास्तवतेमधूनच निघू शकतात. परंतु युटोपियन विचारसरणी अशा प्रकारे त्या त्या सामाजिक वास्तवतेमधून उघडपणे निघत नाहीत मात्र भावी सुखी काळाची व स्थळाची जी प्रत्यक्षातीत कल्पना ( व्हिजन त्या विचार-सरणीत आलेली असते त्या कल्पनेबरहुकूम तो सामाजिक वास्तवता बदलण्याचे उद्दिष्ट तेथे असते. अनेकदा या युटोपियी कल्पना त्या त्या समाजातील सामाजिक द्रष्टा मांडतो. किंवा जुन्या करारातील प्रेषितांसारखा प्रेषित त्या कल्पना मांडतो. हे द्रष्टे किंवा प्रेषित त्यांच्या स्वतःच्या सुखी आयुष्यासंबंधिच्या कल्पना आणि त्यांच्या गटाच्या किंवा पंथाच्या अथवा सामाजिक वर्गाच्या तशाच प्रकारच्या भावी सुखाच्या प्रतिकात्मक स्वप्नरंजनांच्या कल्पना प्रत्यक्ष परिस्थितीशी एकत्रित करुन त्यातून आपापला युटोपिया रचतात युटोपियाची ही अगदी सर्वसाधारण व्याख्या. ही व्याख्या विचारात घेतल्यास युटोपिया कोठल्या देशात वा काळात नव्हता असे म्हणता येणार नाही.

युटोपियात ज्या प्रकारच्या कल्पना असतात त्याच प्रकारच्या दुसऱ्या

कल्पना म्हणजे Millenarianism च्या किंवा Millenial Socieaty च्या कल्पना होत. शब्दश: अर्थ घ्यावयाचा झाल्यास मिलेनारिअँनिझम म्हणजे ख्रिस्ती धार्मिक कल्पनांप्रमाणे अतिम न्यायदान आटोपल्यावर भूतलावर ख्रिस्त परत येणार असून तो आणि मरून पुन्हा जिवंत झालेले त्याच्यावरोबरचे संत हे वैभवशाली साम्राज्यावर राज्य करतील आणि हे त्यांचे राज्य त्यानंतर बरोबर एक हजार वर्षेपर्यंत टिकेल ही कल्पना होय. या कल्पनेत दुसऱ्या दोन कल्पना अंतर्भूत आहेत. व आपल्या पुढील चर्चेसाठी त्याच खरोखर महत्वाच्या आहेत. एक तर जगात सुष्ट शक्ती आणि दुष्ट शक्ती असा एक चिरंतन झगडा चालतो. आणि काही काळ का होईना सुष्ट शक्ती दुष्ट शक्तींचा पाडाव करुन त्याच्यांवर कवजा चालवितात दुष्ट शक्ती सुष्ट शक्तींच्या आहारी आल्या की, मग काही काळ पृथ्वीवर चांगल्याचो चंगळ असते. पुन्हा अर्थात दुष्ट शक्ती प्रबळ होऊन सुष्ट शक्तीना मागे लोटतात. व पुन्हा एकदा सुष्ट - दुष्ट शक्तींचा लढा होतो. या त्या दोन कल्पना होत.

आपल्याकडची चार युगाची कल्पना ही देखील सुख–सहस्त्रवर्षाच्या कल्पनेशी शोभणारी आहे. हिंदु धर्मशास्त्राप्रमाणे काळ हा चक्राकार आहे. आणि हे चक्र चार युगात फिरते. पहिले युग कृत किंवा सत्य. दुसरे त्रेता तिसरे द्वापर आणि चवथे कली. चार युगे मिळून एक महायुग होते. कृत, त्रेता, द्वापर, कली ही नावे फाशाच्या खेळातील दानाच्या "आकडयावरून" घेतली आहेत चाराचा आकडा हे पूर्ण दान म्हणून पहिले युग हे पूर्ण युग. त्याची वर्षे चार हजार, अधिक, उजाडण्यापूर्वीची चारशे व काळोखापूर्वीचे चारशे; त्यानंतर त्रेतायुग ते तीन हजार वर्षांचे अधिक तीनशे व तिनशे नंतर द्वापर. ते दोन हजार अधिक मागे पुढे दोन दोनशे वर्षांचे व शेवटचे कली. ते हजार वर्षांचे व मागेपुढे शंभर शंभर वर्षांचे. पहिले आणि सगळयात दीर्घ युग कृत यालाच सत्य असेही आणखी नाव आहे कारण हे खरे, उत्तम, 'Real' युग असते. या युगात माणसे स्वभावत:च धर्माने वागतात. हे खऱ्या अर्थाने सुवर्णयुग होय. न्याय, सुख आणि समृद्धी या तिन्ही गोष्टींचा वरचष्मा या युगात आढळतो. एका अर्थी धर्म म्हणजेच मानवी अस्तित्व अशी परिस्थिती या युगात असते.

त्रेता युगात माणसे धर्मापासून थोडी खाली येतात. कारण आता ती फक्त तीन चतुर्थांश धर्म पाळतात. आता मनुष्याला कष्ट करावे लागतात. त्याच्या नशिबी क्लेश असतात. आणि मरणही असते. स्वभाव म्हणून माणसे धर्माने वागत नाहीत तर धर्माने वागण्याची त्यांच्यावर सक्ती करावी लागते. द्वापर-युगात फक्त एक द्वितियांश धर्म उरतो. जातीजातीत भ्रष्टाचार वाढतो. पापे

आणि अधर्म वाढतात. मनुष्याची आयुर्मर्यादा खाली येते. कलीयुगात फक्त एक चतुर्थांश धर्म उरतो. सगळीकडे अनाचार, आपापसातले वैमनस्य वाढलेले असते. या युगात ज्याच्याकडे मालमत्ता तो मोठा मानला जातो. धनदौलतीवर मनुष्याची लायकी ठरविली जाते. खोटेपणा वाढतो. पाप वाढते. अधर्म वाढतो.

४, ३, २, १ या आकडयातून युगांची कमी कमी होत जाणारी लांबी तसेच धर्माचे अधःपतन सूचित होते. सत्ययुगापासून खाली खाली येत जावे तसतसे असत्य, अधर्म, अन्याय यात वाढ होत जाते, मनुष्याची आयुर्मर्यादा कमी होत जाते. भ्रष्टाचार, पाप वाढत जाते. मनुष्याची अवनती होते.

कलीयुग संपले की, पुन्हा सत्ययुग येते. काल अशा प्रकारे चक्राकार गतीने फिरतो.

महायुगाच्या किंवा काळाच्या चक्राकार गतीच्या या कल्पकथेचा ( मिथचा ) अर्थ काय? हाच की, हे जग जन्माला येते वाढते, थकते, नष्ट होते आणि फिरून परत जन्माला येते. म्हणजे मनुष्याच्या जन्मात सुःख आणि दुःख कधीही कायम नसते. सुखामागोमाग दुःख आणि दुःखामागोमाग सुख हे रहाटगाडगे अटळ आहे.

काळाच्या चक्राकार गतीशी संबंधित अशी दुसरी विचारसरणी गीतेत आढळते. भगवंताच्या अवताराची. गीतेत श्रीकृष्ण म्हणतो की, जेव्हा जेव्हा भूतलावर पाप आणि अधर्म वाढतो, दुर्जन प्रबळ बनतात तेव्हा दुर्जनांचे पारिपत्य करून सज्जनांना संरक्षण देण्यासाठी मी पुन्हा पुन्हा अवतार घेतो. येथेसुद्धा सज्जनांसाठी चांगला काळ संपून वाईट काळ येणे व मागाहून तो वाईट काळ जाऊन परत चांगला काळ येणे हीच काळाच्या चक्राकार गतीची कल्पना अंतर्भुत आहे.

युटोपिया आणि सत्ययुगाच्या कल्पनेप्रमाणेच ज्या ज्या सांस्कृतिक वा तंत्रवैज्ञानिकदृष्टया मागास देशात प्रगत गोरे लोक गेले आणि ज्या ज्या ठिकाणी तेथल्या मूळ लोकांनी आपल्या मूळ संस्कृतीवर व धर्मावर परक्यांचा घाला आला म्हणून परक्या गोऱ्यांविरुद्ध सशस्त्र उठाव केले त्या उठावाच्या तत्त्वाचाही वापर गल्ड यांनी १८५७ च्या उठावाच्या विश्लेपणात केला आहे. अप्रगत समाज आणि उच्च संस्कृती यांचा परस्परांशी संपर्क आला की, जे काही [illegible] त्यावर त्यांचे हे निष्कर्ष घेतलेले आहेत. अशा एकूण तीनचार चळवळींचा उल्लेख गुल्ड करतात. उदा. घोस्ट डान्स चळवळ, कार्गो कल्ट चळवळ, आणि नेटिव्हिस्ट चळवळ. याही प्रकारांची माहिती आपणास [illegible] हवी.

सांस्कृतिक, औद्योगिक, तंत्रवैज्ञानिक आणि इतर हरएक बाबतीत मागे असलेले आशिया, आफ्रिका, अमेरिका देशातील आदिम समाज याच बाबतीत अधिक प्रगत, प्रबळ व उच्चभ्रू असणाऱ्या समाजांच्या सहवासात येण्याचा हा प्रकार गेल्या पाचशे वर्षातला आहे. या काळात युरोपमधल्या अनेक राष्ट्रांनी बाहेरच्या देशांवर राजकीय कबजा करण्याचा प्रयत्न केला. तसेच व्यापार वगैरेंच्या निमित्ताने त्यांच्याशी संधान बांधण्याचा प्रयत्न केला. आणि त्यातून या धार्मिक चळवळी उत्पन्न झाल्या.

युरोपिय समाज शिक्षित ( लिटरेट ) होते. अनेकदृष्टचा प्रबळ होते. सुसंघटित आणि आकारानेही मोठे होते. तुलनेने हे मूळ रहिवाश्यांचे समाज आकाराने लहान, न-शिक्षित, दुर्बल होते. जेथे जेथे अशा प्रकारे प्रबळ वरची आणि दुर्बल मागास संस्कृती व समाज एकत्रित आले तेथे तेथे मागास समाज व संस्कृतीमध्ये तेथल्या मूळ धर्मापेक्षा वेगळचा प्रकारच्या धर्मांना चालना मिळत गेल्याचे आढळून आले आहे.

या नव्या धार्मिक चळवळींचा बारकाईने विचार केल्यावर असे दिसून येते की, या नव्या चळवळी पूर्णपणे नवीन नसतात आणि जुन्याही नसतात. त्या जुन्या धर्मांचीं केवळ नक्कल नसतात तसेच नव्या परक्या संस्कृतीच्या धर्मांचींही त्या नक्कल नसतात. तर तेथल्या आधिच्या व आता नव्याने आलेल्या परक्या अशा दोन्ही धर्मांची लक्षणे त्यात आपणास दिसून येतात. एका अर्थी या चळवळी म्हणजे नवे धर्मच असतात.

या धार्मिक चळवळींच्या निरिक्षणातून आणखी एक गोष्ट दिसून येते ती ही की, या सगळचाना चालना म्हणून कारण झालेली परिस्थिती एकाच प्रकारची असते. या चळवळींची व्यवच्छेदक लक्षणेसुद्धा सारखी असतात. त्यांचे विविध प्रकार वरवरच्या तपशीलात जरी वेगवेगळे वाटले तरी आतून सारखे असतात. हे सर्व साम्य पाहून मानववंशशास्त्रात त्यांचा विचार एकत्रित करतात.

तथापि एकटचा मानववंशशास्त्रज्ञांनीच काही या चळवळींचा विचार केला आहे असे नाही. इतरही शास्त्रांच्या अभ्यासूना या चळवळीत रस वाटला आहे. आणि म्हणून त्याही शास्त्राच्या अभ्यासूनी त्यांच्या विशिष्ट शास्त्रांच्या भूमिकेतून या घडामोडींचा अभ्यास करून स्वतःचे निष्कर्ष दिले आहेत. विशेषतः विसाव्या शतकाच्या मध्यावर आणि त्यानंतरच्या काळात या चळवळींच्या अभ्यासाचे फार मोठे पीक आल्याचे आढळते.

गंमत अशी की, प्रत्येक अभ्यासक फक्त त्यांच्या शास्त्राच्या दृष्टीतून या

चळवळींचा विचार करतो आणि आपले मत मांडतो. त्यामुळे राजकारणाचा विचार करणारानी या चळवळींच्या एका अंगावर भर दिल्याचे दिसते. तर समाजशास्त्रज्ञांनी त्यापेक्षा वेगळ्या अंगावर आणि मानसशास्त्र, सांस्कृतिक मानवशास्त्रज्ञ, धर्मेतिहासकार आदिनी वेगवेगळ्या अंगावर भर दिल्याचे दिसते. उदा. च्या अभ्यासकांना या चळवळींच्या फक्त राजकीय मतितार्थात आस्था होती; नव्हे जे विशेषतः वसाहतवादाच्या घडामोडींच्या दृष्टीतूनच या चळवळींकडे पहात होते ते या चळवळींचे वर्णन करताना त्याना क्रांतीवादी पंथ, बंडखोर प्रेषितांच्या चळवळी, अस्वळ स्वरूपाच्या राष्ट्रवादी चळवळी म्हणतात. या अभ्यासकांच्या ह्या विशिष्ट शब्दप्रयोगावरूनच आपल्या ध्यानात येईल की, या मंडळीना या चळवळींच्या फक्त राजकीय महत्वामध्ये रस होता. तेव्हा फक्त तेवढेच विशेष त्यानी टिपले उलट मानसशास्त्रीय दृष्टिकोनातून जे लोक या चळवळींचा विचार करीत होते त्याना या ( राष्ट्रीय ) आणीबाणीच्या काळातल्या चळवळी ( क्रायसिस कल्टस् ) वाटल्या. किंवा नागवणूकीतून जन्मलेल्या चळवळी ( डिप्रायव्हेशन कल्टस् ) वाटल्या. किंवा सुधारणावादी आणि पुनरुज्जीवनवादी चळवळी वाटल्या. समाजशास्त्रज्ञ त्यांच्या समाजशास्त्रीय चष्म्यातून या घटनांकडे पहातात. व म्हणून या चळवळीना त्यांच्यापैकी कोणी फुटिरतावादी चळवळी म्हणतात. तर कोणी त्याना स्वतंत्र व नवे पंथ समजतात. तर आणखी कोणी त्याना स्वयंस्फूर्त धार्मिक समाज ठरवितात. वा बहुजनसमाजाच्या चळवळी म्हणतात. सांस्कृतिक मानवशास्त्रज्ञ याच चळवळींना सांस्कृतिक तडजोडीच्या चळवळी किंवा दोन भिन्न संस्कृतींचे मिश्रण ( acculturation ) वेगळ्या संस्कृती असलेले दोन पृथक समाज जेव्हा दीर्घकाळपर्यंत निकट परस्पर सान्निध्यात येतात तेव्हा त्यांचा परस्परांवर परिणाम होऊन त्या दोन्हीही समाजात काही फेरफार घडून येतात त्या फेरफारांना उद्देशून अकल्चरेशन हा शब्द वापरला जातो. या संबंधात लक्षात ठेवण्याची गोष्ट ही की, परस्पर- सान्निध्यामुळे दोन्ही समाजात फक्त फेरफारच घडून येतात दोन्हीपैकी एकही समाज स्वतःची मूळ ओळख गमावित नाही. सगळे बदल मूळ ओळख कायम राखून घडलेले असतात. फक्त याच प्रकारच्या सामाजिक रूपांतरास अकल्चरेशन हा शब्द वापरला जातो ) म्हणतात. दुसरे काही मानवशास्त्रज्ञ या चळवळीना नेटिव्हिस्टिक म्हणजे एखाद्या आदिम समाजातील रहिवाश्यानी स्वतःचे मूळ स्वरूप निरंतर टिकून रहावे म्हणून केलेल्या चळवळी असेही म्हणतात. इतर कोणी याच चळवळीना पुनरुज्जीवनवादी चळवळी किंवा रूपांतरवादी ( ट्रान्सफॉर्मेटिव्ह ) चळवळी

असेही म्हणतात. धार्मिक चळवळींच्या इतिहासाचा अभ्यास करणाऱ्यानीही या चळवळींकडे लक्ष पुरविले आहे. या चळवळींच्या काही ठळक पण समान लक्षणांवर भर देऊन त्यानी या चळवळींचे वर्णन करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्यापैकी काहीजण या चळवळींना पाखंडी चळवळी म्हणतात. दुसरे काही परस्परविरोधी धार्मिक मतांचा मेळ घालू पाहणाऱ्या धार्मिक चळवळी, किंवा प्रेषित मंडळींनी घडवून आणलेल्या चळवळी किंवा मरणोत्तर न्यायनिवाड्यावर भर देऊ पाहणाऱ्या Eschatological चळवळी ( म्हणजे जगाच्या अथवा व्यक्तीच्या अंतानंतर त्या जगाचे वा त्यातल्या व्यक्तींचे काय होणार, त्यांच्या पापपुण्याचा निवाडा केला जाऊन त्याना स्वर्ग वा नरक कसा दिला जाणार इत्यादी गोष्टींची चर्चा करणाऱ्या व तसल्या कल्पनांवर आधारीत चळवळी ) म्हणतात. कुणी याच चळवळीना सहस्र सुखी वर्षांच्या चळवळी ( परमेश्वर पुण्यवानाना वाचवितो आणि पाप्याना नाहीसे करतो. पुढे परमेश्वराच्या कृपा-प्रसादास पात्र झालेले हे पुण्यवान लोक एकहजार वर्षेपर्यंत अत्यंत सुखाने राज्य करतात या कल्पनेवर आधारीत चळवळी ) असेही म्हणतात. तर कुणी याच चळवळीना अवतारी पुरुषांच्या अथवा तारक पुरुषांच्या चळवळी म्हणतात

या सगळ्या चळवळींच्या ठिकाणी काही समान लक्षणे दिसतात. उदा. या चळवळी आधुनिक शिक्षणाच्या व संस्कृतीच्या बाबतीत मागासलेल्या समाजामध्ये घडतात. त्यांचे सर्वसाधारण स्वरूप धार्मिक चळवळींचे असते. हे लक्षण तर इतके महत्वाचे आहे की, या चळवळींचे धार्मिक स्वरूप हे अशा प्रकारच्या चळवळींचे एक व्यवच्छेदक लक्षण म्हणता येईल. मात्र याचा अर्थ असा नाही की, या चळवळीना ऐहिक महत्वाकांक्षेचे वावडे असते. तर हेही विचार या चळवळीत आढळतात. कधी कधी तर ऐहिक आणि पारलौकिक अशा दोन्ही विचारसरणी या चळवळीत एकत्रित दिसल्याने त्यांच्या स्वरूपा-विषयी अनेकांची फसगत होते. आणि मग कोणी त्याना आर्थिक चळवळी म्हणतो तर कोणी राजकीय, सामाजिक, धार्मिक अशी वेगवेगळी विशेषणे लावतो.

या चळवळींचे दुसरे महत्वाचे लक्षण हे की, एका विशिष्ट प्रकारच्या सामाजिक - राजकीय परिस्थितीतच या चळवळी जन्म घेतात. जर का ही विशिष्ट परिस्थिती निर्माण होऊ शकली नाही तर या चळवळी घडत नाहीत उदा. प्रगत आणि अप्रगत अथवा सांस्कृतिक आणि औद्योगिकदृष्टया पुढारलेल्या व त्याच बाबतीत मागासलेल्या अशा दोन भिन्न पातळींवरील समाज परस्परसा-न्निध्यात आले, त्यानी एकमेकांवर परिणाम केला. परस्परापासून सांस्कृतिक

मामग्रीची उमनवार केली तरच या प्रकारच्या चळवळी घडतात. वर अकल्चरेशनची चर्चा करताना याची चर्चा आलीच आहे.

दोन भिन्न पातळीवरच्या संस्कृती एकत्रित आल्याने जी धार्मिक चळवळ त्या प्रदेशात सुरु होते तिचे स्वरूप त्यापैकी कोठल्याही एका संस्कृती वा धर्माप्रमाणे नसते. ते या दोन्ही पंथांच्या स्वरूपापेक्षा वेगळे असते. त्यामुळे या नव्या पंथाचे अनुयायी स्थानिक व परकी अशा दोन्ही पंथांच्या लोकांपासून अलग पडतात. तसेच स्थानिक धर्मांचे अनुयायी त्याना जवळ करीत नाहीत आणि परकी आक्रमक धर्मांचे अनुयायीही त्याना जवळ करीत नाहीत. स्थानिक लोकाना स्वतःच्या धर्मांचे स्वरूप शक्य तितके विरुद्ध राखायचे असते म्हणून ते या नव्या पंथवाल्याना स्वतःच्या जवळ करीत नाहीत. त्या ठिकाणच्या ज्या लोकानी चढाईखोर विदेशी संस्कृतीचा धर्म स्वीकारलेला असतो ते बाटगेही त्याना जवळ करीत नाहीत. कारण त्यांच्या दृष्टीने हे नव्या पंथाचे अनुयायी धर्मप्रसाराच्या बाबतीत त्यांच्याशी स्पर्धा करीत असतात. उलट हे नव्या धर्माचे लोक एतद्देशीय मूळ धर्मियाना आणि बाटग्याना कोणालाही जवळ करीत नाहीत. मात्र अशा प्रकारे हे सर्वजण जरी परस्पराना पाण्यात पाहत असले तरी नव्या धर्मांचे मूळ एतद्देशीय स्थानिक धार्मिक समजुतीत व आचारविचारात आणि विदेशी धर्मांच्या आचार-विचारात असते हे विसरून चालणार नाही देशी-विदेशी अनेक कल्पना संकरीत करूनच हा नवीन पंथ आणि त्याची चळवळ सुरू झालेली असतात.

या चळवळींना कारणीभूत ठरणाऱ्या घटकांचा विचार केल्यास असे म्हणता येईल की, मुख्यतः चार प्रकारचे घटक त्यात गुंतलेले असतात. उदा. काही घटक परिस्थितीवाचक (सिच्युएशनल अॅकल्चरेटिव्ह) असतात दुसरे काही चळवळ सुरू होणार असल्यास तिला भर देणारे (कॉन्ट्रिब्युटिव्ह) असतात. तिसरे काही चळवळीचा प्रश्न धसास लावणारे (Precipitative) असतात. तर चवथे काही चळवळी घडविण्यास कारण पुरविणारे (enabling) असे असतात.

अ) परिस्थितीवाचक घटक :- याची चर्चा वर येऊन गेली आहे. अप्रगत जमातीवर जेव्हा एखादा प्रगत समाज स्वतःची सत्ता लादतो तेव्हा ती सगळी जमात अस्वस्थ होते व तेथे या चळवळी घडन येतात. मात्र या परिस्थितीत चळवळ घडेलच असे खात्रीलायकपणे सांगता येणार नाही. या परि-स्थितीत चळवळ घडेल अथवा घडणार सुद्धा नाही म्हणजे हा घटक आवश्यक

आहे परंतु तो पुरेसा नाही. त्याच्याच बरोबर आणखी इतर काही घडले तरच चळवळ जन्म घेते.

ब) प्रोत्साहनकारक घटक : — अनेक प्रकारचे घटक या चळवळीना साह्यभूत होतात. (१) सभोवतालची मानवी परिस्थिती जेव्हा फार झपाट्याने बदलू लागते किंवा परकी आक्रमणाने जेव्हा अनिश्चित व अनोळखी परिस्थिती निर्माण होते. तेव्हा तेव्हा माणसे अस्वस्थ बनतात. त्यांच्या मनावर ताण येतो. त्याना वैफल्यग्रस्तता येते. आपण परिस्थितीपुढे हतबल बनलो आहोत असे त्याना वाटू लागते. विशेषत: जी जी माणसे महत्वकांक्षी आणि कर्तृत्ववान असतात त्याना तर ही बदललेली परिस्थिती फारच त्रासदायक ठरते.

(२) परक्या, विदेशी सत्तेचे आक्रमण म्हणजे परक्या संस्कृतीचेच आक्रमण. या सांस्कृतिक आक्रमणाबरोबर जमातीच्या स्वत:च्या आयुष्यात सांस्कृतिक व सामाजिक अव्यवस्था माजते. परिणामत: वरील सारख्या नव्या चळवळी नव्या सामाजिक गटांना कशाला ना कशाला बांधिल राहिल्याचे मानसिक समाधान पुरवितात. तसेच आयुष्यातल्या प्रश्नांवर चळवळीच्या रूपाने काही नवे तोडगेही सुचवितात.

(३) परकी विदेशी संस्कृती आणि मुळची देशी संस्कृती यांच्या झगड्यामुळे पारंपरिक व्यवस्था आणि नवी आक्रमक व्यवस्था यातही संघर्ष निर्माण होतात. हे संघर्ष नैतिक स्वरूपाचे असतात. नव्या चळवळीबरोबर नव्या नैतिक व्यवस्था येत असल्याने आणि या नव्या व्यवस्था दोन्ही संस्कृतींमधून उसनवारी करून बनविल्या जात असल्याने हे संघर्ष नव्या धर्मात व नैतिक व्यवस्थेत आपोआप सुटू शकतात व या कारणाने अशा चळवळी घडतात.

(४) राजकीय अंमल, मग तो जुलमी असो वा मावाप सरकारच्या धर्तीचा असो, ज्या ज्या राजकीय अंमलामध्ये जुन्या प्रस्थापित राजकीय परंपरा व व्यवस्था मोडून जातात वा खिळखिळ्या होतात तेथे तेथे नवीन धार्मिक चळवळीना चालना मिळत असते. याचे कारण हे असते की, या चळवळी नव्या संघटनात्मक कार्याला आणि नेतृत्वाला संधी देतात. आणि कधी कधी राजकीय कृतीलाही वाव मिळवून देतात.

(५) लोकांच्या जमिनी काढून घेतल्या जाणे अशासारखे आर्थिक नागवणूकीचे व लुबाडणूकीचे प्रकार जेथे घडले त्या उत्तर अमेरिकेत, दक्षिण आफ्रिकेत-न्होडेशियात आणि न्यूझिलंड मध्ये नव्या धार्मिक चळवळीना प्रोत्साहन मिळाल्याचे दिसून येते. कारण जेत्यानी लादलेल्या नव्या अर्थव्यवस्थेत शेतजमिनीत खपून निर्वाह करता येण्याची संधी राहिली नाही. उलट तेथे मजुरीची पद्धत आली.



अनुक्रमणिका

ही मजुरीसुद्धा वेठबिगारी प्रमाणेच होती किंवा स्थानिक लोकांऐवजी उपऱ्यांच्या हाती होती. तसेच अनेक नव्या गरजा लोकांत प्रसृत झाल्या होत्या. या सर्वांमुळे लोकांतली अस्वस्थता वाढत जाऊन चळवळी घडल्या.

(६) जेथे जेथे वसाहतीचा राज्यकारभार होता तेथे तेथे नव्या धार्मिक चळवळी हमखास घडून आल्या असल्याने वसाहतीच्या राजवटीची परिस्थिती ही एक या प्रकारच्या चळवळींसाठी चालक परिस्थिती असते असे म्हणता येईल. मग या राजवटी जुलमी असोत अथवा नसोत. धार्मिक चळवळी तेथे टाळता आलेल्या नाहीत.

क) चळवळीची निकड वाढविणारे घटक– चळवळीसाठी भूमी तयार असते. अशा वेळी एखादा साथीचा रोग येऊन खूप माणसे दगावतात किंवा दुसरीच कसलीतरी महाभयानक आपत्ती कोसळून देशच्या देश संकटात सापडतो आणि चळवळीला अकस्मात चालना मिळते. कारण चळवळीसाठी आवश्यक ती परिस्थिती आधीच तेथे असते. फक्त तत्कालिक निमित्ताची कमतरता असते. साथ, लोकांवर लादले गेलेले नवे कर, किंवा विकट आर्थिक मंदी या सारख्या कारणांनी चळवळी उद्भवू शकतात. नवा कर आणि आर्थिक मंदीच्या कारणामुळे पश्चिम आफ्रिकेत एकोणिसशे तिशीच्या पूर्वार्धात "प्रार्थना जमात" नावाची (Aladura) चळवळ घडून आली होती. दुसऱ्या महायुद्धात अमेरिकी लष्कराच्या कित्येक तुकड्या मेलानेशियात उतरल्या होत्या. या तुकड्यांची भौतिक समृद्धी पाहून तेथील लोकांची कल्पनाशक्ती इतकी चाळवली की, तेथे अनेक कार्गो पंथांना चालना दिली गेली. हे पंथ असे मानू पाहत की, तेथे असलेल्या अमेरिकी लोकांना ज्या प्रमाणे बोटी भरभरून खाण्यापिण्याची व इतर आरामाची सामुग्री येते तशीच ती आपणालासुद्धा येणार आहे. कारण अमेरिकी हे आपलेच मरुन जिवंत झालेले पूर्वज आहेत. आता ते श्वेत बेटावर वसती करुन राहिल्याने त्यांचा रंग पांढरा झाला आहे.

ड) चळवळींना मदत करुन चळवळी घडवून आणणारे घटक–

एकत्रित आलेल्या दोन भिन्न संस्कृतींमधील ज्या बाबींमुळे शेवटी चळवळ होणार अथवा नाही हे निश्चित होते त्या बाबींना enabling घटक म्हणता येईल. जगातल्या सगळ्या धर्मांचा विचार केल्यास शेवटी असे दिसते की,जेथे जेथे ख्रिस्ती धर्म गेला तेथे तेथे त्या धर्माने नव्या धार्मिक चळवळींना चालना दिली आहे. याचा अर्थ असा करता येईल की, ख्रिस्ती धर्माच्या एकूण शिकवणुकीत व समजतीतच असे काही गुणधर्म आहेत की, ज्याच्या प्रभावाने जेथे जेथे दुसरा धर्म या धर्माच्या संगतीत येतो तेथे तेथे आधीच्या मूळ धर्माच्या लोकांना

नवी धार्मिक चळवळ उभारावी असे वाटू लागते. वेगवेगळ्या धर्मांचा तुलनात्मक अभ्यास करणारे अभ्यासक असे म्हणतात की, ख्रिस्ती धर्माचे अवाहन जगातील गोरगरीब आणि पीडित यांना असल्याने तसे घडते. जगभरच्या सगळ्या दीनदरिद्री जनतेला जुन्या करारातील त्रस्त व दुःखीकष्टी जनतेच्या मरणोत्तर अंतिम भागध्येयाबद्दल खूपच मानसिक आपलेपणा वाटतो. जुन्या करारातील मोझेस आणि एलायजा या प्रेषितांबद्दल तर त्यांना विशेषच आपुलकी वाटते. नवा करार असे सांगतो की, जगाचा शेवट झाला की, मरुन गेलेले सर्व आत्मे पुन्हा आपापल्या देहाने उठून उभे राहातील व परमेश्वर त्यांचा न्याय करील आणि मग जे आज रडणार आहेत त्या गोरगरीब दीनदुबळ्याना हसण्याचे दिवस येतील व आज हसणाऱ्या माजोरी श्रीमंताना रडण्याचे व शोकाचे दिवस येतील.

जेथे जेथे ख्रिस्ती धर्म वा त्या धर्माची शिकवणूक पोचली आहे आणि जेथे जेथे मूळच्या रहिवाशाना नवी धार्मिक चळवळ उभारावीशी वाटते तेथे तेथे 'आजच्या दिवसावर जरी श्रीमंतांचा हक्क असला तरी उद्यावर मात्र आजच्या गोरगरीबांचाच परमेश्वरी न्यायाने हक्क असणार आहे, ' ही बायबली शिकवण फारच उपयोगी पडते. असे दिसून येते. यावरुन आपणास एक ढोबळ असा निष्कर्ष काढता येईल. तो असा की, दोन भिन्न धर्मांच्या एकत्रित येण्यातून जर का नव्या धार्मिक तत्वज्ञानाचा व चळवळीचा प्रसार व्हावयाचा असेल तर त्या दोन धर्मांपैकी चढाईखोर धर्मापाशी अशी काही लक्षणे हवीत की, जी मूळ मागास धर्मालाही सहजपणे आपलीशी करता आली पाहिजेत. उलट मागास धर्मामध्येसुद्धा अशा काही धार्मिक समजुती व आचार हवेत की, चढाईखोर धर्मांच्या प्रकाशात त्या समजुतींचा व आचारांचा नवा अर्थ लावता येणे त्याना शक्य होईल.

वरील घटकांकडे लक्ष दिले असता दोन संस्कृती एकत्र येऊनसुद्धा सर्वच ठिकाणी धार्मिक चळवळी का घडून येत नसतात; किंवा वेगवेगळ्या ठिकाणी वेगवेगळ्या प्रकारच्या धार्मिक चळवळी का घडतात; किंवा एका ठिकाणी सुरु झालेली चळवळ दुसऱ्या ठिकाणीसुद्धा स्वीकारली जाते वा नाकारली जाते ती का इत्यादी प्रश्नांचा उलगडा होऊ शकेल.

दोन संस्कृती, त्यातील एक औद्योगिक व तंत्रवैज्ञानिकदृष्ट्या प्रगत पण बाहेरची व दुसरी या दोन्ही बाबतीत मागास पण स्थानिक, एकमेकांच्या संगतीत आल्या आणि त्यातील आघाडीची व प्रबळ संस्कृती दुसरीस राजकीय, आर्थिक वगैरे बाबतीत नाडू लागली की, स्थानिक जनता गमावलेली स्वतःची

अस्मिता परत मिळविण्यासाठी चढाईखोर संस्कृतीला स्वतःच्या भूमीवरून हाकलून देण्यास कटिबद्ध होते व धार्मिक, सांस्कृतिक चळवळ उभारते हे आपण पाहिले. गेल्या पाच एकशे एकशे वर्षांत जेथे जेथे युरोपिय लोक गेले आणि जेथे जेथे त्यांचे स्थानिक जनतेशी संघर्ष आले तेथे तेथे परक्या युरोपियनांविरुद्ध स्थानिक जनतेच्या अशा चळवळी झाल्या आहेत. गुल्ड यानी १८५७ च्या ब्रिटिशविरोधी भारतीय उठावाच्या चर्चेच्या संबंधात याही एका मुद्याचा वापर केला आहे. व त्यासाठी त्यानी उत्तर अमेरिकेतल्या 'घोस्ट डान्स' आणि मेलानेसियातल्या 'कार्गो कल्टचा' खास उल्लेख केला आहे. तेव्हा या चळवळी काय होत्या हे थोडक्यात पाहाणे आवश्यक आहे.

युरोपिय लोक जेथे जेथे गेले तेथे तेथे त्यानी स्थानिक जनतेला प्रथम बंदुकीच्या जोरावर व मागाहून स्वतःला फायदेशीर ठरणारी आर्थिकतंत्रे वापरून पार पिडून काढले आहे. स्थानिकाना तोवर अपरिचित असणाऱ्या व युरोपियन लोकानी निर्माण केलेल्या या नव्या परिस्थितीशी जमवून घेताना त्या मूळ रहिवाशाना अनेक प्रकारचा त्रास झाला आहे. या विशिष्ट परिस्थितीत मूळ रहिवाशी गोऱ्यांच्या दडपशाहीला दोन वेगवेगळया प्रतिक्रिया दाखविताना आढळतात. उदा. स्थानिक संस्कृतीच्या तुलनेत जेती युरोपिय संस्कृती जेथे फारच प्रबळ ठरली तेथे स्थानिक जनता वैफल्यग्रस्त बनली व तिने जेत्यांपुढे हातपाय गाळले, अशाप्रकारे मूळ संस्कृतीचा नैतिक – ह्रास होऊन ती संपुष्टात आली. उलट जेथली स्थानिक जनता जेत्याना विरोध करण्याइतकी कडवी व मजबूत होती तेथे त्या जनतेने जेत्यांविरुद्ध चळवळी उभारल्या. या चळवळींचे स्वरूप बऱ्याच बाबतीत धार्मिक होते.

या चळवळीना अनेक मानवशास्त्रज्ञ Nativistic नेटिव्हिस्टक चळवळी असे तांत्रिक नाव देतात. नेटिव्हिस्टिक म्हणजे स्वतःच्या खास एतद्देशियत्वाचे संरक्षण करण्यासाठी, स्वतःचे देशी वैशिष्ठय अभंग राखून पुढेही ते चालू ठेवण्यासाठी प्रयत्न करणाऱ्या किंवा स्वतःचे गेलेले वैशिष्ठय पुनरुज्जित करू पाहणाऱ्या चळवळी होत. या चळवळींचा प्रमुख उद्देश स्वतःचे स्वत्व अभंग राखणे हा होता किंवा गेलेले स्वत्व पुन्हा परत मिळविणे हा होता. आणि त्या नेटिवांच्या परक्यांविरुद्धच्या चळवळी होत्या म्हणून त्याना हे नाव दिले गेले होते. परंतु नेटिव्हिझम या शब्दाला आणखी देखिल एक अर्थ मानवशास्त्रात आहे. नेटिवांच्या परक्याविरुद्धच्या सगळ्या चळवळीना काही लोक सरसकट हा शब्द वापरतात. अर्थात नेटिवांमध्ये अशाही अनेक चळवळी घडून आल्या आहेत. की, ज्या चळवळीना नेटिव जीवनमार्गांचे पुनरुज्जिवन

करावयाचे नव्हते अथवा ते मार्ग अभंगही राखावयाचे नव्हते.

या सगळ्या चळवळींकडे पहाता असे दिसून येते की, यातील खूपच चळवळी नेटिव्हिझम या शब्दाच्या पहिल्या अर्थाने नेटिव्हिस्टिक होत्या. कारण आपल्या लोकांचा जुना आयुष्यमार्ग पुन्हा प्रस्थापित करावा हा त्यांचा प्रमुख उद्देश होता. 'घोस्ट डान्स' ही अशाच प्रकारची एक चळवळ. १८९० च्या दरम्याने अमेरिकेच्या पश्चिम भागातील Great Plains या भागात ही चळवळ सुरू झाली. गोऱ्यानी मोडून टाकलेली आपली पारंपरिक संस्कृती पुन्हा प्रस्थापित करण्यासाठी जे प्रयत्न येथील दृष्टांती–प्रेषितानी केले त्याला 'घोस्ट डान्स' हे नाव आहे. या प्रेषितानी आपले दृष्टांत म्हणून असे जाहीर केले की, लवकरच आपले मृत पूर्वज जिवंत होऊन परत आपल्यात येणार आहेत; (मृत पूर्वज जिवंत होणार म्हणून घोस्ट डान्स हे नाव) गोरे लोक येथून हाकलेले जाणार आहेत; आपल्या जमिनी, आपले पारंपरिक अन्न म्हणजे रेडचांचे कळप, आणि जुने आचारविचार हे सर्व पुन्हा एकदा आपणास परत मिळणार आहेत. लोकांना हे प्रेषित असे सांगत की, हे लवकर घडून येण्यासाठी आपण मोकळ्या जागेत वर्तुळाकार नाच करावयास हवा आणि मृतानी दृष्टांतांमध्ये दिलेली गाणी म्हटली पाहिजे. तसेच नैतिक आचार विचारांचे कडक पालन केले पाहिजे. रेडइंडियनानी इतर रेड इंडियनांशी व गोऱ्यांशी लढता कामा नये. वगैरे. गंमत अशी की, यातील बऱ्याच नैतिक शिकवणुकी ख्रिस्ती धर्मावरून घेतल्या गेल्या होत्या.

'घोस्ट डान्स' या एकूण दोन चळवळी झाल्या. त्यातील पहिली १८६९ ची. तिचा प्रवर्तक वोडझिवोल (मृत्यु १८७२). ही चळवळ १८७१ च्या दरम्यान संपुष्टात आली. दुसरीचा प्रवर्तक वोव्होका. (१८५६-१९३२) या दुसऱ्या चळवळीवर प्रेसबिटेरियन शिकवणुकीचा प्रभाव होता. ही चळवळ देखील नंतर इतर देशी चळवळीत विलिन झाली.

'कार्गो कल्टस्'

या चळवळी मुख्यत्वे मेलानेसियात घडून आल्या. या चळवळीचे अनुयायी आणि प्रेषित अतिभौतिक ठिकाणाहून आपल्यासाठी खास 'भरताड' (कार्गो) येणार आहे असे मानीत. म्हणून कार्गो कल्ट हे नाव. भरताडाबरोबरच कदाचित आपले मृत पूर्वज येतील, आपल्या देवदेवता, आपले वीरपुरुषसुद्धा येतील अशीही त्यांची अपेक्षा असे. काही वेळा ही सामुग्री परकी गोऱ्यांबरोबर येईल असे त्याना वाटे. तर काही वेळा आपले भरताड मधल्या मधे गोऱ्यांनी लंपास केले असेही ते म्हणत.



अनुक्रमणिका



भरवाण बोटीने वा विमानाने येणार अशी अपेक्षा असल्याने माल ठेवण्यासाठी हे गावकरी मोठमोठी गुदामेसुद्धा बांधत. किंवा विमानांना आपला ठिकाणा बरोबर सापडावा म्हणून जागोजाग बावटे लावित. अनेक ठिकाणी तर आता नवा माल येणार मग जुने कशास ठेवा या कल्पनेने अन्नधान्य, डुकरांचे कळप, मालमत्ता त्यानी नष्टदेखील केली होती. काही ठिकाणी जुने पारंपरिक आचारविचार नव्याने सुरू केले जात. तर इतर काही ठिकाणी आता नवे युग अवतरणार तेव्हा सगळे जुने काढून टाकले पाहिजे या इच्छेने चालू आचारविचारात आमूलाग्र बद्दल केला गेला, एवढेच नव्हे तर गोऱ्या लोकांच्या पोलीस दलाची नक्कल करून नव्या सामाजिक संस्था देखिल सुरू केल्या गेल्या.

चळवळीच्या प्रेपितांच्या अपेक्षेप्रमाणे लवकरच काहीतरी उत्पात घडून जुनी राजवट खाक होऊन नवी सुखसमृद्धीचा वर्षाव करणारी राजवट सुरू होणार होती. ही न्याय्य व स्वातंत्र्याची राजवट असणार होती. त्या राजवटीत गोरे चाकर व गावकरी मालक असणार होते.

या चळवळींमागचा राजकीय हेतू पाहून व मालमत्ता नष्ट करण्याची त्या चळवळींची प्रवृत्ती लक्षात घेऊन वसाहतीच्या राज्यातल्या अधिकाऱ्यानी या चळवळी मोडून काढल्या.

गुल्ड यानी हिंदुस्थानातील १८५७ च्या ब्रिटिशविरोधी उठावाचा अर्थ लावण्यासाठी ज्या वेगवेगळ्या तात्विक संकल्पना वापरल्या आहेत त्याची तात्विक फोड येथवर आपण केली. गुल्ड यांच्या म्हणण्याप्रमाणे हा उठाव ही येथील शिपायांचा ब्रिटिशविरोधी संतप्त उद्रेक नव्हता. तर त्याच्या मागे काही तात्विक अधिष्ठान होते. या उठावात कित्येक युटोपियन आशाआकांक्षा होत्या. व त्यातून हा उठाव घडला होता.

१८५७ चा उठाव हा यदृच्छया केवळ अपघाताने, ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्यानी त्यांच्या हाताखालच्या हिंदी सैनिकाना वाईट वागणूक दिल्याने व त्या हिंदी सैनिकानी ब्रिटिश अधिकारी व सत्तेविरुद्ध सूड उगविण्याचा प्रयत्न केल्याने घडला नव्हता असे जेव्हा गुल्ड म्हणतात तेव्हा त्याना पुढील गोष्टी म्हणायच्या असतात. त्याना असे म्हणायचे असते की, ही एक ग्रुप ॲक्शन किंवा सामुदायिक कारवाई असल्याने तिच्या पाठीमागे युटोपियन आशाआकांक्षा आणि विचारप्रवृत्ती होती. या कारवाईच्या मागे काही एक व्हिजन होते. योजना होती. आणि मोटिव्हेशन्स होती. आपण जेव्हा म्हणतो की ब्रिटिशानी हिंदी सैनिकाना व लोकाना वाईट वागविले व म्हणून सैनिक आणि लोकानी



अनुक्रमणिका

ब्रिटिशांवर हत्यारी हल्ला केला तेव्हा आपण असे म्हणत असतो की, ही एक कार्यकारण भावात्मक प्रतिक्रिया होती. ब्रिटिशांचे वाईट वागणे हे कारण आणि त्याला जशास तसे उत्तर अथवा सूड ही प्रतिक्रिया हा परिणाम. परंतु आपण जेव्हा म्हणतो की, ब्रिटिशविरोधी हिंदी हत्यारी कारवाईच्या मागे मानवी मोटिव्हेशन्स होते तेव्हा आपणाला असे म्हणायचे असते की, येथील लोकानी जाणूनबूजून जीवनातला एक मार्ग म्हणून त्या कारवाईचा पवित्रा घेतला होता. ती त्यांची निवड होती. ती केवळ यांत्रिक प्रतिक्रिया नव्हती.

व्हिजन, पूर्वयोजना आणि मोटिव्हेशन्सशिवाय अशाप्रकारच्या परिणाम-कारक सामुदायिक कारवाया घडूच शकत नाहीत. मनुष्यप्राण्याना सामुदायिक कारवाईला आकर्षित करायचे तर मनुष्ये त्या कारवाईकडे ओढली जातील अशा आकर्षक भूमिका त्या कारवाईत त्याना दिसाव्या लागतात. या भूमिका खाजगी नसतील तर सार्वजनिक असतील, कारण या भूमिका गिरवताना नानाप्रकारच्या हालअपेष्टा, क्लेश व प्रसंगी मृत्युसुद्धा वाट्यास येणार असतो. तेव्हा या सगळ्या यातनांची भरपाई करणारे मोक्षोद्धाराचे नाट्य उभे करून दाखविता आले तरच सर्वसामान्य लोकसमुदाय अशा कारवायांकडे ओढला जाऊ शकतो. तसेच लोकसमुदाय जे जे काही अशा प्रसंगी करील त्यात एक सर्वसाधारण सुसूत्रता आणावी लागते. यासाठी योजनापूर्वकता असावी लागते. १८५७ च्या उठाव्यासारख्या कारवाया म्हणूनच फुटकळ प्रतिक्रिया नसतात. असो.

१८५७ ची हिंदी लोकांची ब्रिटिशविरोधी कारवाई ही शिपायांची केवळ फुटकळ हत्यारी प्रतिक्रिया नव्हती ही गोष्ट आणखीसुद्धा एका प्रकारे पाहाता येईल. १८५७ साली येथे जे काही घडले ते सामुदायिक चळवळीच्या स्वरुपाचे होते हे कोणीच नाकारणार नाही. फक्त प्रश्न आहे तो ही सामुदायिक कारवाई कोठल्या प्रकारात मोडते हा होय.

गुल्ड यानी १८५७ च्या हिंदी सामुदायिक कारवाईचा विचार करताना या कारवाईच्या वैचारिक बैठकीत जो युटोपियन अंश होता त्यावर भर दिला आहे. आपणसुद्धा युटोपियन धारणेचाच मुद्दा गृहित धरुन या कारवाईचा विचार केला तर काय दिसते?

दोन वेगवेगळ्या बाजूनी या प्रश्नाचा विचार करता येईल. उदा. या सामुदायिक कारवाया काय बदलू-त्या तेथली सामाजिक जीवनमूल्ये बदलइच्छितात की, तेथल्या समाजाचा नमुनाच बदलू-इच्छितात यावर त्यांचा प्रकार काय हे ठरविता येईल. किंवा हे सामाजिक परिवर्तन त्या चळवळी कशा प्रकारे साध्य

करु पाहातात यावरही ठरविता येईल. पहिल्या प्रकारचा निकष वापरुन या चळवळींची जात ठरविता येणे काहीसे कठीण आहे. कारण जी चळवळ युटोपियन जातीची असेल ती चळवळ स्वाभाविकपणे समजा " सर्वांगीण " बदल नसला तरी मोठा सामाजिक बदल करू इच्छिणार असेल. तेव्हा " बदल कोठले " हा निकष वापरुन चळवळीची जात निश्चित करता येणे कठीण आहे. मात्र बदलांचे स्वरूप विचारात घेऊन चळवळीची जात ठरवू पाहाताना एका गोष्टी-कडे आपणास लक्ष पुरविता येणे शक्य आहे. अशा प्रकारच्या कित्येक चळवळीत युटोपियन घटक असतात हे तर आपण गृहित धरले आहे. हे युटोपियन घटक केवळ आकर्षक चित्रांच्या स्वरुपाचे आणि लोकाना आपल्या मागे ओढून घेण्या-साठी म्हणूनच भूलथापांच्या जातीचे असतील किंवा प्रत्यक्ष खरोखरीच्या योजनांदाखल असतील आपणास हे ठरविता येईल.

सामुदायिक चळवळी आणि त्यातील युटोपियी घटकांचा विचार करताना दुसरा जो निकष वर आपण सूचित केला तो हा की, युटोपियी धारणेने जे बदल या चळवळी घडवू पाहातात त्यांची पद्धती कोणती असते ? ही पद्धत कदाचित शांततापूर्ण व अ-राजकीय साधनानी करायच्या क्रांतीची ( रेव्होल्यूशनचा ) असेल. युटोपियन चळवळींच्या बाबतीत एक गोष्ट आपण कधीही विसरता कामा नये ती ही की, या चळवळी निर्वात प्रदेशात घडत नाहीत. चळवळींच्या पुढाऱ्यांची इच्छा काही असो लोक जसे असतील तसे ते हाताशी धरून त्याना स्वतःची चळवळ संघटित करायची असेल. हे लोक साहजिकच मूळच्या संस्कृतिने घडविलेले व चळवळ नेत्याच्या दृष्टीने बिघडविले गेलेले असतील. परंतु हेच लोक घेऊन काय ती चळवळ पुढे न्यायची असल्याने हे नेते अनुयायी निवड-ण्याच्या बाबतीत स्वतः होऊन काहीही करू शकणार नसतात अर्थात या युटोपियी नेत्याना असे करता येणे शक्य आहे मोठ्या समाजात स्वतःची एक वेगळी आदर्श वसाहत स्थापून तेथील मुलाना लहानपणापासून स्वतःला हवे ते शिक्षण देणे, मोठ्यांचे मनोविच्छेदन करणे इत्यादी गोष्टी ते करू शकतात. परंतु येथेसुद्धा स्थानिक सत्ताधाऱ्यांबरोबर संघर्ष होणार नाही अशा प्रकारे त्याना वागावे लागेल. असो. पण युटोपियी नेत्याना अनुयायांच्या बाबतीत वर म्हणत आहोत तसे निवडीचे स्वातंत्र्य नसले तरी तेथील ज्या संस्था त्यांच्या दृष्टीने टाकाऊ असतील त्या टाळण्याची आशा त्याना बाळगता येते. किंबहुना हे नेते असेही म्हणू शकतात की, भ्रष्ट सामाजिक संस्था टाळूनच आपण आपले कार्य करावयास हवे कारण अशा भ्रष्ट संस्था टिकून राहिल्या की, त्या संस्थांच्या प्रभावाखाली जगणारी मनुष्ये शेवटी त्यांच्या आहारी जाऊन भ्रष्ट बनतात.



अनुक्रमणिका

याच कारणाने अनेक युटोपियी वृत्तीचे नेते स्वतःच्या छोटया वसाहती स्थापण्याचे प्रयत्न करताना दिसतात.

तेव्हा राजकीय-सामाजिक सामुदायिक कारवायांचा विचार करताना त्यांची कार्यपद्धती पाहून ही कारवाई युटोपियी होती की, केवळ बंडखोरीची (म्ह० रिबेलिअसनेसची होती) की, क्रांतीवादी हे ठरविता येईल. चळवळ केवळ बंडखोरीची (रिबेलिअस) असेल तर तिचे पुढारी मूळ संस्था तशाच ठेवू पाहतील; मात्र त्या संस्थांचे चालक ते बदलू पाहतील. म्हणजेच वेगळया अधिक योग्य चालकांकडून मुळच्याच संस्था चालवून समाजाचा उद्धार ते करू पाहतील. क्रांतीमध्ये संस्था बदलतील पण लोक तेच ठेवले जातील. युटोपियी परिवर्तनात लोक आणि संस्था या दोहोत बदल घडवून आणण्याचा प्रयत्न होईल.

या दृष्टीने १८५७ च्या कारवाईचा विचार केल्यास तीत रिबेलिअनचा भाग आहे आणि युटोपियाचाही भाग आहे असे म्हणता येते. असो.

गुल्ड यांचा हा लेख व त्यातील प्रतिपादन कोणाला आवडेल, कोणाला आवडणार नाही. मात्र तो दुर्लक्षित केला असे होणार नाही अशी आशा आहे. आमचे स्नेही श्री. जयंतराव जोगळेकर यांच्याकडून हा लेख अनुवादित करून घेऊन तो छापून प्रसिद्ध करण्यामागे हा एक चांगला विचारप्रवर्तक लेख आहे व त्यात अनेक वेगवेगळया प्रकारच्या शास्त्रीय संकल्पनांची चर्चा असल्याने 'नवी क्षितिजेच्या' वाचकाना त्या लेखाच्या निमित्ताने त्या संकल्पनांचीही माहिती व्हावी हा हेतू तर होताच परंतु गुल्ड यानी आपल्या लोकांच्या मनोधारणेबद्दल जे अप्रगट भाष्य त्या निमित्ताने केले आहे तेही आम्हाला महत्वाचे वाटल्याने ते भाष्यही आपणास द्यावे हाही हेतू होता.

१८५७ च्या येथील सामुदायिक चळवळींबद्दल बोलतनां गुल्ड जणू असे म्हणतात की, येथील लोक सतत असंज्ञ भावनेच्या पातळीवरच जगतात. त्यामुळे एकीकडन सामुदायिक असंज्ञ धमकी व दुसरीकडून त्या धमकीच्या उलट सामुदायिक असंज्ञ आश्वासन भावले म्हणजेच ते कार्यप्रवृत्त होतात. १८५७ च्या दरम्याने ही धमकी ब्रिटिशांच्या सांस्कृतिक-राजकीय-धार्मिक-आर्थिक आक्रमणाच्या स्वरूपात होती, उलट ब्रिटिश गेल्यावर येणाऱ्या ब्रिटिशपूर्व राजवटीचे संमिश्र आणि गौरवपूर्ण चित्र हे त्यांच्या पुढचे त्याना आकर्षित करणारे आश्वासनचित्र होते. आणि या दोन चित्रांच्या धमकीच्या व आश्वासनाच्या-आहारी जाऊन त्यानी १८५७ ची कारवाई केली होती. या कारवाईमागची खरी कार्यप्रेरणा (मोटिव्हेशन्स) ही होती.

आज त्या घटनेला शंभरावर वर्षे उलटून गेली तरी आपण त्याच असंज्ञ पानठीवर वावरत आहोत ही त्यातील खेदाची बाब होय. आता आपल्याकडे लोकशाही आहे. जून एकोणिसशे पंचाहत्तरमध्ये इंदिरा गांधींनी या देशात आणीबाणी आणली. १९७७ मध्ये नव्या निवडणुका झाल्या. त्या काळात लोकांच्या डोळ्यासमोर इंदिरा–राजवट ही प्रच्छन्न धमकी होती तर येऊ घातलेली जनता–राजवट हे पुढील स्वास्थ्याचे अप्रगट आश्वासन होते. साह–जिकच लोकानी जनता-राजवटीच्या आश्वासनाच्या बाजूने कौल दिला. इंदिरा–राजवटीच्या धमकीपासून मनाने पळ काढला. १९८० त परत निवडणुका झाल्या. आता अनेक प्रकारच्या खोटयानाटचा प्रचारामुळे, जनता पक्षातल्या वेगवेगळ्या गटातल्या सततच्या आपापसातील भांडणामुळे जनता–पक्षीय राजवट ही प्रच्छन्न धमकी बनली होती व त्या राजवटीच्या तुलनेत एकदा त्याज्य मानलेली इंदिरा-राजवट भावी सुरक्षिततेच्या आश्वासनाची हमी ठरली होती.

एवंच आम्ही लोक नेहमी कसल्या ना कसल्या खऱ्या वा काल्पनिक भयाने ग्रस्त असतो व ते भय दूर करण्याचे आश्वासन कोणी दिले की, त्या आश्वासना-मागे आश्वासन देणाऱ्याच्या पाठी डोळे झाकून दौडतो हे जे काही चित्र या लेखातून आमच्या संबंधी निघते त्याचा विचार आपणाकडून व्हावा हीच आमची अपेक्षा.

संपादक

## द युटोपियन माइंड ऑफ इंडियन

राइझिंग – हॅरॉल्ड गुल्ड

१

१८५७ साली इस्ट इंडिया कंपनीच्या विरुद्ध हिंदुस्थानात एक मोठा उठाव घडून आला. हा उठाव ही हिंदुस्थानात घडून गेलेल्या हिंसक व रक्तलांछित उलथापालथींकी एक सर्वात मोठी घडामोड होती. एवढे असून सुद्धा या हिंसक घटनेचा अर्थ लावण्याचे काम इतिहासकाराना तितकेच कठीण होऊन राहिले आहे. हे काम किती कठीण व अवघड आहे याचा उत्तम पुरावा मायकेल एडवर्डस या इतिहासकाराच्या उदाहरणात पहावयास सापडतो. सत्तावनच्या उठावास कारणीभूत झालेली परिस्थिती व प्रसंग याचा आढावा घेण्याचा प्रयत्न एडवर्डस





यांनी केला आहे.[१] " ते म्हणतात, " हे बंड ही एक सरंजामी स्वरुपाची प्रतिक्रिया होती. येथल्या समाजाच्या सर्वच्या सर्व स्तराना ब्रिटिश अधिसत्तेचे दडपण असह्य होऊ लागल्याने ही प्रतिक्रिया घडून आली होती, बंगाली लष्करातल्या असंतोषाच्या रुपाने ह्या प्रतिक्रियेला प्रथम तोंड फुटले. विविध प्रकारचे आणि परस्पर विरोधी असे सुद्धा हितसंबंध बंडखोरांच्या पाठीशी एकत्रित झाले होते. ह्या बंडाचे स्वरूप राष्ट्रीय आणि राष्ट्रवादी होते की नाही याविषयी तज्ञात वाद आहे. हा वाद अर्थातच भारतीय इतिहासकारांनी निर्माण केला आहे ज्या उठावाला राष्ट्रीय उठाव म्हणता येईल असे स्वरुप या बंडाचे नव्हते. जो सरंजामदारी गट ह्या उठावात सामील झाला होता त्या गटाला ब्रिटिशांचे पाय या देशाला लागण्यापूर्वी जी परिस्थिती येथे होती तीच परिस्थिती फिरुन येथे आणायची होती. तर शिपायांनी बंड केले होते ते त्यांच्या दृष्टीने त्यांच्या स्वतःच्या सुरक्षिततेसाठी. या संपूर्ण प्रकरणात देशातील शांतता व सुव्यवस्था मोडकळीस आली व समाजातल्या इतर गटानी साहजिकच त्या परिस्थितीचा फायदा घेतला. काही काही ठिकाणी लोकांच्या जमावाने कारखान्यांवर हल्ला करून आतल्या सामानाची नासधूस सुद्धा केली. त्या दृष्टीने पाहिल्यास या घडामोडीत अगदी स्पष्ट स्वरुपात लुडिट छटा दिसतात. ( लुडिट छटा – १८ व्या शतकाच्या प्रारंभी इंग्लंडातल्या मिडलॅंडस् आणि उत्तरेकडच्या परगाण्यात प्रथमच जेव्हा यांत्रिक कारखाने सुरू करण्यात आले तेव्हा स्वतंत्रपणे हस्तव्यवसाय करणाऱ्या इंग्लिश कसबी कारागिरांनी त्या कारखान्यांवर सामुदायिक हल्ले केले व आतील यंत्रसामुग्रीची मोडतोड केली. ही यंत्रे आपल्या पोटावर पाय आणित आहेत असा त्यांचा दावा होता. तेव्हापासून यांत्रिक कारखान्यांवर हल्ला करून आंतील यंत्रसामुग्री कारागिरानी नष्ट करण्याच्या सामुदायिक प्रकारास लुडिट असा शब्दप्रयोग इंग्रजीत वापरतात. हा शब्दप्रयोग नेड लुडिट नावाच्या एका भ्रमिष्ट इंग्रज मनुष्याच्या वर्तनावरुन आला आहे. एकदा रागाच्या भरात लुडिटने कित्येक यंत्रे मोडून टाकली. तेव्हापासून रागाच्या भरात यंत्रावर हल्ला करण्याच्या सामुदायिक प्रकाराला लुडिट वागणे असे म्हणण्यात येते.) रोजगारीपासून आपणास वंचित करणाऱ्या यंत्रसामुग्रीबद्दलच्या रोषातून कारागिरांच्या जमावानी ही यंत्रे मोडली असल्याने या बंडामध्ये काही प्रमाणात वर्गसंघर्षाच्या छटा देखील होत्या असे म्हणता येते. "

तांत्रिक दृष्टिने विचार केल्यास १८५७ चा उठाव हा बंगाल लष्करातल्या

---

१ मायकेल एडवर्डस् – राज ( लंडन पॅन बुक्स, १९६७ पृ. ७८ )





शिपायांचा उठाव होता. या बंडाला प्रारंभ दिल्लीशेजारी मीरत येथे १० मे रोजी झाला. आणि तेथून ते बंड बंगालच्या हद्दीपर्यंत आणि दक्षिणेस दख्खनच्या पठारापर्यंत वेगाने पसरत गेले. सांकृतिक दृष्टीकोनातून या बंडाचा विचार केल्यास असे म्हणावे लागते की, हे बंड एडवर्डस् म्हणतात त्याप्रमाणे केवळ शिपायांचे बंड नव्हते. केवळ बंडापेक्षा ते काहीतरी अधिक होते. कारण संपूर्ण हिंदुस्थानभर इंग्रजांच्या विरुद्ध असंतोष तेव्हा निर्माण झाला होता हे सिद्ध करता येईल इतक्या मोठ्या प्रमाणात हिंदुस्थानी समाजाचे भाग आणि उपभाग त्या बंडात सामील झाल्याचे दिसून येते. तथापी हा उठाव ही राष्ट्रीय चळवळ नव्हती असे जे एडवर्डस् म्हणतात ते सुद्धा बरोबर आहे. न्याय, सुधारणा आणि स्वातंत्र्य या त्रयीची मागणी ज्या राष्ट्रीय चळवळीत असते त्याच चळवळीला राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ म्हणता येते. भारतीय राष्ट्रवादी लेखक जरी या तिन्ही मागण्यांचा स्पष्ट उच्चार या चळवळीत होता व म्हणून ही राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ होती असे आग्रहाने सांगत असले तरी त्यांचे प्रतिपादन सिद्ध करील असा पुरावा उपलब्ध नाही.

आता असा प्रश्न उपस्थित होतो की, १८५७ चा उठाव जर केवळ बंडात वा शिपायांच्या गर्दीत मोडत नाही आणि राष्ट्रीय चळवळीतही मोडत नाही— शिपायांच्या भाऊगर्दीपेक्षा जर ते काहीतरी अधिक होते पण राष्ट्रीय स्वातंत्र्य चळवळीपेक्षा ते काहीतरी कमी होते— तर हा उठाव निश्चित कशात मोडतो? आपण आता तेच पाहाणार आहोत.

तथापि ऐतिहासिक घटनाक्रमांचा अभ्यास करण्याची नेहमीची ऐतिहासिक पद्धत वापरून आपला हा हेतू साध्य होणार नाही. तेव्हा ही पद्धत घटकाभर बाजूला ठेवून आणि मानवशास्त्रज्ञानी लोकप्रिय केलेल्या संज्ञा व कल्पनांपैकी काही संज्ञा व कल्पना घेऊन व त्यांच्या आधारे एक नवाच दृष्टीकोन तयार करून १८५७ च्या उठावाची छाननी आपण करू या. आपणाला या उठावाचा खरा अर्थ शोधावयाचा आहे. आणि मला वाटते की, या नवीन प्रकारच्या बौद्धिक चौकटीतून जर का या संपूर्ण घडामोडींची तपासणी आपण केली तर या उठावात एक सुसूत्रता व योजनाबद्धता आपणास आढळून येण्याची शक्यता आहे.

कोणत्याही देशी संस्कृतीवर विदेशीय राजवटीने राजकीय जोरजबरदस्ती आणि दडपशाही सुरू केली की, ती देशी संस्कृती त्या जोरजबरदस्तीविरुद्ध स्वतःची तीव्र प्रतिक्रिया व्यक्त करताना दिसून आली आहे. मानवशास्त्रज्ञानी या प्रकाराचा अभ्यास केला असून या अभ्यासावरून या प्रकारच्या सांस्कृतिक

घडामोडीसंबंधी त्यांनी स्वत:चे काही आडाखे बांधले आहेत. काही एक तात्विक चौकट तयार केली आहे. परदेशी सत्तांविरुद्ध देशी लोकांनी केलेल्या उठावांचे विश्लेपण करताना ही तात्विक चौकट उपयोगी पडते.

देशी संस्कृतीवरचा जुलूम आणि त्या जुलूमाची देशी प्रतिक्रिया यांच्या विश्लेषणातून हा दृष्टिकोन तयार झाला आहे. आणि या जुलूमाचे मूळ आहे पाश्चात्यांच्या वागण्यात. पाश्चात्य लोक फार मोठ्या संख्येने उरलेल्या जगात गेले. जेथे ते गेले तेथे फार मोठ्या प्रमाणात आपले तंत्रविज्ञान त्यांनी नेले. तेथील मूळच्या लोकांवर स्वत:चो सत्ता व तंत्रविज्ञ:न त्यानी लादले. स्वत:ची आर्थिक व राजकीय पद्धती त्या लोकांवर लादली. हे लोक वेगवेगळ्या वंशाचे होते. ते वेगवेगळ्या सांस्कृतिक थरांवर होते. या वस्तुस्थितीचा विचार न करता पाश्चात्यानी हे सर्व केले. या कृत्यात गेल्या ३०० वर्षात त्यांना नाट्यपूर्ण यशही मिळाले. पण या यशामुळे या देशातल्या मूळच्या रहिवाशांसाठी, त्यांच्या संस्कृतींसाठी एक जीवनमरणाचा प्रश्नही उपस्थित झाला.

पाश्चात्यांच्या प्रभावी आर्थिक-राजकीय स्वरुपाच्या माऱ्यापुढे स्वत:ची वेगळी सांस्कृतिक अस्मिता कशा प्रकारे टिकवून धरावी हा एक वेगळाच प्रश्न पाश्चात संस्कृतीने या संस्कृतिपुढे निर्माण केला आहे. पाश्चात्यांच्या ह्या आक्रमणामुळे आपल्या संस्कृतिचा समूळ उच्छेद होणार अशी भीति या मूळ रहिवाश्याना वाटू लागली. आणि या भीतिपोटी पाश्चिमात्यांविरुद्ध अनेक प्रकारच्या तीव्र प्रतिक्रिया या संस्कृतींमध्ये घडून आल्या. पाश्चात्यांच्या जुलमी प्रभावाविरुद्ध ज्या तीव्र सांस्कृतिक प्रतिक्रिया बाहेरच्या संस्कृतीतल्या मूळच्या रहिवाशात घडून आल्या त्या प्रतिक्रियांसाठी मानवशास्त्रज्ञांनी "पुनरुज्जीवनवादी चळवळी, ( Revitalization Movements ) असा शब्दप्रयोग तयार केला आहे.

या " पुनरुज्जीवनवादी चळवळींमध्ये " स्वप्नाळू आशावादाचे प्रमाण खूपच अधिक होते. कारण या चळवळींची सगळी भिस्त अद्‌भुत दैवी चमत्कारांवर होती. काहीतरी दैवी चमत्कार घडून येणार व मग आपले भाग्य उजळणार अशी आशा उराशी बाळगून या चळवळींच्या पाठी हे लोक लागत होते. उदा. यातील काही चळवळींच्या पुरस्कर्त्यांना अशी आशा वाटत होती की, लवकरच काही ना काही दैवी चमत्कार घडून येईल आणि आमच्यावर जुलूम जबरदस्ती करणाऱ्या या युरोपियन लोकांचा समूळ नि:पात घडून येईल. आणि एकदा त्यांचा तसा नि:पात झाला की, पुन्हा एकदा आपल्या देशात आमच्या वाडवडिलांचा प्रतिष्ठीत मार्ग प्रस्थापित होईल व आम्ही सुखाने कालक्रमणा



अनुक्रमणिका



करु. जुलूम करणारे पाश्चात्य लोक देशातून निघून गेल्यावर ज्या सुखी कालखंडाचे चित्र हे लोक रंगवित होते त्यातसुध्दा वस्तुस्थितीपेक्षा स्वप्नरंजनाचेच प्रमाण अधिक होते.

गंमत अशी की, वसाहतीतले परके सैनिक, तेथील परके राज्यकर्ते आणि सर्वसामान्य इतिहासकार या सर्वांच्या दृष्टीने या चळवळी निव्वळ बेशिस्त हाणामाऱ्या होत्या. त्यांच्यात सुसूत्रता नव्हती किंवा वैचारिक योजनासुध्दा नव्हती. तथापी मानव शास्त्रज्ञांनी तयार केलेल्या नव्या तात्विक चौकटीतून जर याच चळवळींकडे आपण पाहिले तर त्यांचे खरे मर्म आपल्या लगेच ध्यानात येते. एवढेच नव्हे तर या चळवळींमागील लोकांची उद्दिष्टे, त्या चळवळींची ऐतिहासिक कारणेसुध्दा ध्यानात येऊन ही उद्दिष्टे व कारणे यात जी एक स्वाभाविक सुसूत्रता, सुसंगतता, एकसंधता आणि एकवाक्यता होती ती देखील आपल्या लक्षात येते.

पुनरुज्जीवनवादी चळवळींचा बारीक अभ्यास करून ॲन्थनी एफ्. सी. वॅलेस या विद्वान गृहस्थानी या चळवळींच्या कार्यपद्धतीसंबंधी एक सामान्य सूत्र तयार केले आहे वॅलेस म्हणतात की, या चळवळी म्हणजे जमावाच्या गर्दीने केलेले फुटकळ हल्ले नव्हेत. या चळवळींच्या पाठीमागे तेथील लोकांचे तत्वज्ञान होते. एक नवी आणि सुखी संस्कृती निर्माण करायची आहे अशा बुद्धिपुरस्सर विचारातून या चळवळी घडत होत्या. या चळवळीत सुसूत्रता होती असे अगदी स्पष्टपणे आढळून येते. वॅलेस पुढे म्हणतात की, "सांस्कृतिक क्रियाप्रक्रियांचा दृष्टीकोन वापरून जर आपण या पुनरुज्जीवनवादी चळवळींचा विचार केला तर असे दिसून येईल की, पुनरुज्जीवनाचे हे प्रयत्न सांस्कृतिक परिवर्तनांच्या व्यापारात मोडतात. या प्रकारच्या चळवळींचे काही ठळक विशेष आहेत.

उदा. – १) ज्यांना स्वतःच्या संस्कृतीच्या विशिष्टपणाविषयी जाज्वल्य अभिमान वाटतो असेच लोक त्या संस्कृतीच्या नावाने लढण्यासाठी पोटतिडीकेने तयार होतात. म्हणजे अशी चळवळ घडून येण्यासाठी तेथल्या रहिवाशाना स्वतःच्या संस्कृतीबद्दल अथवा तिच्या महत्वाच्या भागाबद्दल प्रखर अभिमान वाटावयास हवा. २) आपली संस्कृती स्वायत्त व स्वतंत्र आहे; ती दुय्यम नाही असेही त्याना वाटावयास हवे. (मग हे वाटणे सयुक्तिक असो अथवा नसो.) ३) या संस्कृतीबद्दल ते समाधानी नसावेत. ४) प्रचलित संस्कृतीच्या तुलनेत अधिक आकर्षक अशा दुसऱ्या सांस्कृतिक अवस्थेचे चित्र त्याना स्वतःशी रंगविता आले पाहिजे, थोडक्यात आपण जुनी व्यवस्था टाकावी आणि तिच्या जागी एक



अनुक्रमणिका

नवी व्यवस्था आणावी असे त्या रहिवाश्याना वाटावयास हवे. ५) येऊ घातलेल्या नव्या व्यवस्थेत नागरिकांचे परस्परांबरोबरचे सामाजिक संबंध तर मुळातल्यापेक्षा वेगळ्या प्रकारचे दिसले पाहिजेत परंतु त्या व्यवस्थेचा संपूर्ण साचाच पूर्वीच्या साच्यापेक्षा वेगळ्या स्वरूपाचा दिसला पाहिजे. ज्या चळवळीच्या ठिकाणी वर दिली ती सगळी लक्षणे आढळतात त्याच चळवळीना सांस्कृतिक पुनरुज्जीवनवादी चळवळी म्हणता येईल."[२]

वॉलेस वगैरे मानवशास्त्रज्ञानी सांस्कृतिक दृष्टया प्राथमिक अवस्थेत असणाऱ्या टोळ्या करून राहणाऱ्या समाजांचा अभ्यास केला होता. आणि त्या अभ्यासावर आधारून सामाजिक पुनरुज्जीवनाच्या क्रियाप्रक्रियांसंबंधीचा स्वतःचा सिद्धांत बसविला होता. साहजिकच हा सिद्धांत संकुचित स्वरूपाचा झाला होता. कारण जे समाज त्यानी अभ्यासले ते खूपच मागासलेले होते. त्यामुळे त्या मागासलेल्या समाजात जे घटक त्याना आढळले किंवा जी लक्षणे त्याना दिसली तेवढचे घटक व लक्षणे हिशोबात घेऊन त्यांचा सिद्धांत तयार केला गेला होता. जे समाज सांस्कृतिकदृष्टया वेगळया थरावर होते ते अर्थातच या अभ्यासातून वगळले गेले होते पण ते वगळले गेले तेवढया प्रमाणात त्यांचा सिद्धांत देखिल संकुचित बनला होता. असो

वॅलेस वगैरेनी सांस्कृतिकदृष्टया साध्या किंवा टोळीवाल्या समाजांचा अभ्यास केला. त्यामुळे त्यानी अशा समाजात व त्यांच्या विशिष्ट पातळीवर आढळणाऱ्या समान सांस्कृतिक लक्षणांवर भर देऊन आपले सिद्धांत तयार केले. त्याना अर्थात तसे करण्यावाचून इलाजच नव्हता. ज्या पातळीवरच्या समाजाचा अभ्यास त्यानी केला त्या पातळीची लक्षणे त्यांच्या सिद्धांतात अंतर्भूत केली गेली. असे वाटते की. या चळवळी सांस्कृतिक पुनरुज्जीवनासाठी केल्या जातात ही गोष्ट पहिल्या प्रथम जेम्स मुनी या विद्वानाने शोधून काढली असावी. कारण या प्रकारच्या चळवळींचे पहिले सुसंगत स्पष्टीकरण आपणाला मुनीच्याच ग्रंथात सापडते. एकोणीसाव्या शतकाच्या शेवटास अमेरिकेतील तेव्हा विरळ बनत चाललेल्या 'प्लेन्स इंडियन' लोकात घोस्ट डान्स (Ghost Dance) नावाची जी एक धार्मिक चळवळ होऊन गेली तिचे इत्थंभूत आणि सुबोध वर्णन आपणाला मुनीच्याच ग्रंथात आढळते.[३] 'प्लेन्स इंडियन'

(२) अँथनी एफ. सी. वॅलेस, 'रिव्हायटलायझेशन मुव्हमेंटस्' अमेरिकन अॅन्थ्रॉपॉलॉजिस्ट–५८(१९६६.) २६५.

(३) जेम्स मुनी, द घोस्ट डान्स–रिलिजन अमंग द इंडियन्स ऑफ द वेस्टर्न प्लेन्स ( बर्कली अँड लॉस अॅंजेलिस : युनिव्हर्सिटी ऑफ कॅलिफोर्निया प्रेस; १९५१ )

लोकातील घोस्ट डान्स चळवळीनंतर अशा प्रकारच्या चमत्कृतिजन्य चळवळींच्या अभ्यासाचे एक मोठे पीकच मानवशास्त्राच्याप्रांतात आले.

पाश्चात साम्राज्यवादाच्या रेट्यामुळे मेलोनेसियातल्या मूळ रहिवाशांमध्ये कार्गो कल्टस् नावाचे धार्मिक पंथ उदयास आले होते. या कार्गो पंथाचे अभ्यास एकोणिसशेवीस सालानंतर प्रथम बाहेर पडत गेले. लवकरच 'घोस्ट डान्स' किंवा 'कार्गो कल्टस्' अशासारख्या आदिम जमातीतल्या चित्रविचित्र सामाजिक उलथापालथींवर वर्णनात्मक आणि विश्लेषणात्मक लिखाणाला शास्त्रीय जगतात शास्त्रीय लिखाण म्हणून मान्यता मिळाली.[४] नेटिव्हिस्ट चळवळींबद्दलचा राल्फ लिंटन[५] या विद्वानाचा लेख किंवा वॉलेस यांचा पुनरुज्जीवनाच्या चळवळींवरचा लेख म्हणजे या प्रकारच्या विवेचनाला शास्त्रीय तत्वात बसविण्याच्या प्रारंभिक प्रयत्नाचे नमुनेच होत. परंतु लिंटन किंवा वॉलेस हे फक्त आदिवासी समाजासंबंधी जी माहिती होती त्या माहितीवरच अवलंबून राहातात. सांस्कृतिकदृष्ट्या वरच्या पातळीवरच्या समाजात ज्या पुनरुज्जीनाच्य चळवळी घडून आल्या त्या चळवळींकडे ते वळत नाहीत. आपल्या प्रबंधात तसल्या माहितीचा वापर करीत नाहीत. साहजिकच त्यांच्या या प्रयत्नावर आपोआपच काही मर्यादा पडतात. पुढे आपण अधिक सखोल अभ्यासासाठी याच मुद्याकडे वळणार आहोत. कारण १८५७ मध्ये ब्रिटिशांच्या विरुद्ध हिंदी लोकांनी जो उठाव केला त्या उठावाचा विचार करताना या मुद्यात आपणाला शिरावे लागणारच आहे. येथे एवढे सांगितले म्हणजे पुरे की, पुनरुज्जीवनवादी चळवळींच्या अभ्यासकांनी ते अभ्यास करताना वापरलेले संकेत घेऊन या उठावाचा विचार जर आपण केला तर इतर लोक समजतात तसा हा उठाव म्हणजे अनेक असंबद्ध कारणपरंपरांची व घटनांची खिचडी नसून याच्या पाठीमागे काही एक सुसंबद्ध योजना होती या निष्कर्षाला आपण येऊन ठेपतो.

० ० ०

---

(४) पिटर एम्. वर्सली, द ट्रंपेट शाल साऊंड ( न्यूयॉर्क शोकेन बुक्स, १९६८); तसेच पिटर लॉरेन्स, रोड बिलॉंग कार्गो ( मँचेस्टर युनिव्हर्सिटी प्रेस, १९६४ )

(५) राल्फ लिंटन, 'नेटिव्हिस्टिक मुव्हमेंट' अमेरिकन अँन्थ्रॉपॉलॉजिस्ट ४५, (१९४३) : २३०-२४०





१८५७ सालच्या उठावाचा विचार तर आपण करणारच आहोत. पण तत्पूर्वी मूनी यांच्या 'घोस्ट डान्स' नावाच्या धार्मिक पंथासंबधिच्या ग्रंथातील एका विशेष परिच्छेदाचा परामर्ष आपणास घ्यावयाचा आहे. कारण 'घोस्ट डान्स' सारख्या धार्मिक चळवळींना कारणीभूत होऊ शकणाऱ्या परिस्थितीची तपशिलवार चर्चा त्यात आली आहे. आणि तीच तात्विक चौकट वापरून आपण १८५७ च्या घटनाक्रमांचे परिशिलन करणार आहोत.

या प्रकारच्या चळवळी आदिम व मागास समाजात कशा सुरू होतात या प्रश्नाचा उहापोह करताना मूनी म्हणतात की, एकूण तीनचार गोष्टींमुळे या चळवळी घडून येऊ शकतात. उदा. एखादा समाज जेव्हा एकीकडे भौतिक दुर्दशेने ग्रासलेला, चिंताग्रस्त व भयचित्त आणि सांसारिक क्लेषांनी पीडलेला असतो परंतु दुसरीकडे, यानंतर आपणाला खूप चांगले दिवस येणार आहेत अशी भूस्वर्गाची कल्पनाचित्रेही रंगवित असतो तेव्हा या सर्व गोष्टींच्या एकत्रित परिणामातून तेथे 'घोस्ट डान्स' सारख्या सार्वजनिक पुनरुथ्थानाला उत्तेजन देणाऱ्या धार्मिक चळवली घडून येतात. मूनी यांचे नेमके शब्द असे.

"गमावलेल्या स्वर्गाची कल्पना ही तर जगभरच्या तरुणवर्गाची स्वप्न-भूमीच आहे. जगात असा एक तरी मानवी समाज वा वंश सापडेल काय की, ज्या समाजात वा वंशात सुवणयुग किंवा सत्ययुगाची कल्पना प्रसृत नाही... विशेषत: तो सगळा लोकसमुदाय परकी सत्तेच्या जुलमाखाली पिचत असावा अशा वेळी तर लोकोद्धारक स्वातंत्र्यवीराचे हे स्वप्न नैसर्गिकच आहे. विजन-वासातून मायदेशी परत येणाऱ्या किंवा दीर्घकाळाच्या मोहनिद्रेतून जागा होणाऱ्या व परकी जुलमी सत्तेला स्वत:च्या मायभूमीतून बाहेर हाकलून देऊन आपल्या लोकांचे गेलेले वैभव त्याना परत मिळवून देणाऱ्या राणा प्रतापाचे स्वप्न त्या परतंत्र लोकांच्या बाबतीत स्वाभाविक नसते असे कोण बरे म्हणेल? प्रारंभीची ही आशा पुढे श्रद्धा बनते. आणि प्रेषित व धर्मगुरूंच्या हाती तिला संप्रदायाचे रूप येते. शेवटी जेव्हा हा लोकोद्धारक वीरपुरुष देवतेच्या पंक्तीला पोचतो तेव्हा त्या वीरश्रेष्ठाचे स्वप्न तेथल्या धर्मात परिणत होते.–त्या स्वप्नाच्या यशस्वी सांगतेसाठी निसर्गाच्या महान चमत्काराकडे डोळे लावून बसलेला धर्म ...'[६]

---

६ मुनी : घोस्ट डान्स रिलिजन, पृ. १

वरील परिच्छेदात ज्या कल्पना मांडल्या आहेत त्या कल्पनांच्या पार्श्व-भूमीवर ब्रिटिश इस्ट इंडिया कंपनीच्या नोकरदारानी म्हणजेच हिंदी शिपाई-गड्यानी जे बंड केले त्या बंडाचे विश्लेषण आणि विवेचन आपणास करता येईल जर तसे विश्लेषण आपण केले तर आपल्या असे ध्यानात येईल की, हे बंड करण्यापूर्वी, आता लवकरच आपण ब्रिटिशांच्या जुलमी जोखडाखालून कायमचे मुक्त होणार, असे येथल्या हिंदी शिपायाना ठामपणे वाटू लागले होते. कारण त्यांचे बंड हे एका सत्ययुगाच्या स्वप्नाचे उपफलित आणि केंद्रबिंदू होता. सत्ययुगाच्या या कल्पनेने भारतीय जनतेच्या मनाचा कबजा घेतला होता. विशेषतः दूरवरच्या लोकांपर्यंत ते स्वप्न जाऊन पोहोचले होते आणि या स्वप्नाच्या प्रभावाखाली ही जनता वावरत असल्यानेच परकी शत्रूवर एवढ्या त्वेषाने ती तुटून पडू शकली. येथील जनतेपाशी नव्हती चांगली शस्त्रास्त्रे की नव्हते कुशल सेनानी. परंतु त्यांची ही उणीव त्यांच्या मनातल्या ब्रिटिशां-वरच्या त्वेषाने जणू भरून काढली होती.

भारतीय इतिहासातल्या ह्या रक्तपाती नि गुंतागुंतीच्या प्रसंगाची सुरवात झाली होती एका अतिशय अतर्क्य अशा घटनाक्रमाने. पहा. एक केवळ व्यापारी कंपनी इंग्लंडच्या राजाकडून परदेशी व्यापाराची सनद घेऊन भारतात येते काय आणि भागभागिदारांकडून गोळा केलेल्या पैशावर सुरू झालेली व इंग्लंडातल्या बोर्ड ऑफ डायरेक्टरांच्या सल्ल्यानुसार चालणारी तीच कंपनी शेवटी ह्या एवढ्या मोठ्या खंडप्राय देशावर स्वतःचा अंमल जारी करते काय ? सारेच कल्पनाशक्तीच्या पलीकडचे ! या साऱ्या अद्भूत घटनाक्रमांचा औपचारिक प्रारंभ २३ जून १७५७ रोजी म्हणजे बंडाच्या बरोबर १०० वर्षे आधी प्लासीच्या लढाईपासून झाला होता. या जागी रॉबर्ट क्लाइव्ह याने कटकारस्थानांच्या जोरावर बंगालचा नवाब सुराजउद्दौला याचा पराभव घडवून आणला होता. पोरखेळ वाटाव्या इतक्या सहजगत्या हे घडले होते आणि ब्रिटिशाना येथील लोकांवर विजयश्री मिळाली होती.[७]

गंमत म्हणजे कंपनीने हिंदी आणि युरोपिय सैन्याच्या जोरावर हा विजय संपादन केला होता. या विजयाबरोबरच बंगालची प्रत्यक्ष राजकीय सत्ता इस्ट

---

७ या प्रबंधात ज्या घटनांची चर्चा केली आहे. त्यांच्या विषयीची अधिक माहिती भारतीय इतिहासावरील कोणत्याही प्रमाणभूत ग्रंथात मिळेल. त्यापैकी एक उत्तम ग्रंथ म्हणजे आर. सी. मुजुमदार यांचा अॅन अॅडव्हान्स हिस्टरी ऑफ इंडिया (लंडन, मॅकमिलन १९५३)



अनुक्रमणिका



इंडिया कंपनीच्या हाती सुपूर्द झाली होती. (कायदेशीर सत्ता मात्र दिल्लीच्या मोंगल बादशहाच्याच हाती राहिली होती.) बंगालची राजकीय सत्ता ब्रिटिशांच्या हाती आल्याने जो कोणी ब्रिटिशांच्या हितसंबंधाना जपेल अशा कोठल्याही नामधारी बाहुल्याला नवाब म्हणून बंगालच्या गादीवर बसविता येणे इस्ट इंडिया कंपनीला सहजसाध्य झाले.

बंगालवर स्वतःचा प्रत्यक्ष कबजा प्रस्थापित करताना येथल्या दुय्यम राजेमहाराजाना पाठिंबा देण्याचे व त्याना स्वतःच्या बाजूला वळवून घेण्याचे तंत्र कंपनीने स्वीकारले होते. व अशा प्रकारे स्वतःला अंकित असलेल्या नबाबाला व तेथील इतर मानकरी राजेमहाराजाना पुढे करून सगळ्या राज्यकारभाराची सूत्रे मात्र स्वतःच्या हाती राखण्याचे काम कंपनीने चालविले होते. तथापि या कामात कंपनीला म्हणावे तसे यश येत नव्हते. कारण बंगालच्या नवाबाचे आश्रित राजेमहाराजे तर कंपनीवर बिथरत होतेच परंतु बंगालचा खुद्द नामधारी नवाब मीर कासीम हा देखील कंपनीवर उलटून कंपनीबरोबर उघड शत्रुत्व करावयास सिद्ध झाला होता.

प्लासीच्या लढाईनंतर बरोबर सात वर्षांनी म्हणजे १७६४ साली कंपनीने या सर्वांचा बक्सारच्या लढाईत पाडाव केला. अशा प्रकारे पडत्या मोंगल साम्राज्याच्या पूर्वेकडच्या ह्या महत्वाच्या फार मोठ्या प्रांतावर कंपनीची स्वतःची अखत्यारी आली. या खेपेला कंपनीने स्वतःच्या सत्तेला कायदेशीरही स्वरूप दिले. म्हणजे असे की, बंगालवर राजा म्हणून कायदेशीर हक्क दिल्लीच्या बादशहाचा होता. कंपनीने याच बादशहाकडे बंगाल प्रांताची दिवाणी (जमिनीचा सारा वसूल करण्याचा कायदेशीर अधिकार) मागितली; आणि दिल्लीचा नामधारी बादशहा दुसरा 'शहा आलम याच्याकडून तो अधिकारी त्यानी मिळविला. हे अधिकार हाती येताच बंगाल, बिहार व ओरिसा (म्ह. तेव्हाचा बंगाल प्रांत) या प्रदेशावर राज्य करण्याचे कायदेशीर अधिकार कंपनीच्या हाती आले. बंगालची प्रत्यक्ष राज्यकारभाराची सत्ता आधीपासूनच कंपनीच्या हातो होती. दिवाणी अधिकार कंपनीला मिळताच कायदेशीर सत्ता देखिल कंपनीची झाली.

बंगाल प्रांताचे कायदेशीर अधिकार हाती येताच स्वतःच्या व स्वतःच्या नोकरीत असणाऱ्या व्यापारउदम्यांच्या व नोकरदारांच्या फायद्यासाठी ह्या अधिकाराचा गैरवापर करण्याचे व हा संपूर्ण प्रदेश लुटण्याचे सत्र कंपनीने सुरू केले. एकीकडे ही कायदेशीर लूटालूट सुरू होती तर दुसरीकडे संधी मिळताच कायदा मोडून स्वतःचो आर्थिक भर करण्यासाठी आर्थिक दडपेगिरी करण्याचे



अनुक्रमणिका

तंत्रसुद्धा कंपनीने जारी ठेवले. परिणामतः भारतीय प्रदेशावरचा इस्ट इंडिया कंपनीचा ताबा वाढत वाढत उत्तरेकडे गंगेच्या खोऱ्यापर्यंत आणि दक्षिणेकडे दःखनच्या पठारापर्यंत जाऊन पोचला. (मुंबई व मद्रास येथील कंपनीच्या इतर शाखा संधी मिळेल तो प्रदेश घशात घालितच होत्या.) अशा प्रकारे सगळे भारतीय उपखंडच शेवटी कंपनीच्या परिणामकारक अधिकाराखाली आले.

इस्ट इंडिया कंपनीची सत्ता जसजशी पसरत गेली आणि तिचा राजकीय व लष्करी प्रभाव जसजसा वाढत गेला तसतसे ब्रिटिश संस्था आणि इकडच्या देशी संस्था यांच्यातील लढ्याचे स्वरूपसुद्धा बदलत गेले. उदा. अगदी प्रारंभी इस्ट इंडिया कंपनी आणि येथल्या अनेक फुटकळ राजकीय सत्ता या दोहोत एकूण स्वरुपाच्या व परिणामाच्या दृष्टीने फारसा फरक नव्हता. इतर सत्ता सारखीच ही देखील एक सत्ता होती. फरक इतकाच की, बाकीच्या सत्ता देशी होत्या तर ही सत्ता परकी होती. मोंगल सत्तेचा ऱ्हास होता होताच आणि मध्यवर्ती राजकीय सत्ता मोडल्याने हिंदुस्थानात जिकडे तिकडे प्रादेशिक रावजटी बळावल्या होत्या. स्वतःचे वर्चस्व वाढविण्यासाठी व जमेल तसा स्वतःचा फायदा करुन घेण्यासाठी या राजवटी धडपडत होत्या, एकमेकांविरुद्ध कटकारस्थाने करीत होत्या, प्रसंगी आपापसात लढतसुद्धा होत्या. कंपनीसुद्धा या अनेक सत्तांपैकी एक सत्ता असल्याने ती सुद्धा याच प्रकारच्या कार्यक्रमात त्यावेळी दंग होती.

या काळातल्या सामान्य मनुष्याच्या आयुष्याचा विचार करता असे म्हणता आले असते की, तत्कालीन जगात व्यक्तीचे आयुष्य अत्यंत कष्टप्रद, बेभरंवशाचे आणि अनेकदा तर जीवावरच्या साहसात अडकलेले होते. हे झाले त्याच्या दैनंदिन आयुष्याविषयी. मात्र त्याचे सामाजिक व सांस्कृतिक आयुष्य जुन्याच पूर्वापार चालत आलेल्या राजकीय, सांप्रदायिक आणि आर्थिक चौकटीला धरून चालू होते. पुढे कंपनीने म्हैसूरचे राज्य, मराठ्यांचे राज्य, शिखांचे राज्य. हैद्राबादचे संस्थान अशी अनेक लहानमोठी स्वयंत्र हिंदी राज्ये शस्त्रबळावर जिकून स्वतःच्या प्रत्यक्ष अंमलाखाली आणली. यातच दिल्लीचा मोंगल बादशहा आणि औंधचा नबाब हे देखील इंग्रजांच्या हातातले खेळणी बनले. या सर्व गोष्टींचा परिणाम असा झाला की, इंग्रज लोक आणि हिंदी लोक या दोघातला झगडा पूर्वी जो केवळ राजकीय बाबतीत होता तो आता सांस्कृतिक बाबतीतही सुरू झाला.

हिंदुस्थानचा बराच मोठा भूभाग इंग्रजांच्या अंमलाखाली आल्यानंतर



अनुक्रमणिका

त्यांच्या पद्धतीने येथील कारभार ते पाहू लागले. त्यांची राज्यकारभाराची पद्धती हिंदी पद्धतीपेक्षा सर्वस्वी वेगळी होती. तशातच त्यांच्या एकतर्फी कारभाराची व्याप्तीसुद्धा फार मोठी होती. पूर्वीची एकेकटी राज्ये व्याप्तीच्या दृष्टीने फार छोटी असत. इंग्रजांच्या राज्यकारभाराची व्याप्ती वाढता वाढता सांस्कृतिक क्षेत्रापर्यंत पोहोचू लागली. अतएव पूर्वीचे केवळ राजकीय महत्वाकांक्षेसाठी चालू असलेले झगडे संपुष्टात येऊन त्या ऐवजी दोन भिन्न संस्कृतीतले सांस्कृतिक भिन्नतेमुळे होणारे झगडे आता सुरू झाले. इंग्रजी संस्कृतीचे हिंदी संस्कृतीवरील हे आक्रमण एवढ्या मोठ्या प्रमाणावर होते की, त्याला आक्रमण न म्हणता ब्रिटिश संस्कृतीचा हिंदी संस्कृतीवरचा चौफेर आघातच म्हणावयास हवा.

ब्रिटिशांच्या येथील अंमलाचे हे खरे स्वरूप थोड्याच काळात येथील लोकांच्या ध्यानात येऊ लागले. नुसतेच जाणवू लागले असे नव्हे तर त्यांच्या मनात ते एक प्रचंड भीती निर्माण करू लागले. हिंदी लोकाना आता असे प्रकर्षाने वाटू लागले की, ब्रिटिशांच्या परकी सांस्कृतिक आघाताखाली आपली देशी हिंदी संस्कृती लवकरच नष्ट होऊन जाणार. आपला धर्म, आपले धार्मिक संप्रदाय आपली कौटुंबिक जीवनपद्धती, राज्यकारभाराची आपली विशिष्ट पद्धत, सामाजिक प्रतिष्ठेच्या आपल्या जुन्या परंपरा हिंदी म्हणून असलेली आपली स्वतःची खुद्द ओळख सारे सारे काही आम्ही या प्रकरणात गमावून बसणार.

एखाद्या संस्कृतीवर दुसऱ्या सर्व बाबतीत अगदी वेगळ्या असणाऱ्या संस्कृतीचे जेव्हा अशा प्रकारचे आक्रमण होते व त्या पहिल्या संस्कृतीला जीवन मरणाचे भय वाटू लागते तेव्हा तेथील लोक मनाने एकीकडे अगतिक बनतात. आणि दुसरीकडे त्या विरोधी संस्कृतीबद्दल तितकेच तामसी बनतात. कारण परक्या संस्कृतिच्या आक्रमणाबरोबर त्यांची आत्मरक्षण बुद्धी जागृत होते. आणि ही बचावाची बुध्दी जागृत होताच ते काही विशिष्ट सामुदायिक प्रतिक्रिया दाखवू लागतात. उदा. भविष्यात आपण टिकून राहू की, नाही अशी भीती वाटणाऱ्या संस्कृतीला लवकरच पुन्हा एकदा आपल्या मातृभूमीवर नवे सत्ययुग अवतरणार आहे आणि हे नवे सत्ययुग अवतरले की, आपल्या देशात नवा भूस्वर्ग सुध्दा निर्माण होणार आहे या प्रकारची स्वप्ने दिसू लागतात. आणि या दोन स्वप्नांबरहुकूम त्यांच्या प्रतिक्रिया घडू लागतात. ( नेमके हेच हिंदी लोकांच्या बाबतीत घडले होते. )

हिंदुस्थानवर कंपनीचे सार्वभौमत्व प्रस्थापित झाले. आणि येथील जनतेच्या मनात स्वतःच्या अस्मितेच्या अनिश्चितेची चिंता निर्माण झाली. या देशावर

स्वतःची निर्विवाद सत्ता प्रस्थापित व्हावी म्हणून इंग्रजानी तंत्रवैज्ञानिक, आर्थिक राजकीय व नैर्बंधिक किंवा कायदा विषयक ( ज्युरिडिकल ) अशा ज्या अनेकविध नव्या योजना जारी केल्या त्याचा हा परिणाम होता. असे काहीच येथील जनतेला तोवर माहित नव्हते. त्यामुळे आपण अवघेची बुडालो आणि येथून आपले म्हणावे असे या देशात काहीच उरणार नाही अशी जनतेची भावना झाली. स्वतःच्या भवितव्याच्या असुरक्षितपणाबद्दलची ही भिती एवढी तीव्र होती की, हां हां म्हणता तो आख्ख्या देशभर पसरली. आणि थोडयाच काळात या भीतीची जागा भीती निर्माण करणाराबद्दलच्या क्षोभाने घतली. बंगाल लष्कर हा या क्षोभाचा प्रमुख केंद्रबिंदू होता.

अर्थात तसे घडण्याला अनेक कारणे होती. एक म्हणजे हे बंगाल लष्कर मुलतः भाडोत्री सैनिकांचे होते. बंगाल प्रांतावर स्वतःची हुकमत जारी करण्यासाठी कंपनीने हे सैन्यदल प्रथम तयार केले होते. बंड घडले त्या सुमारास या सैन्यात एकूण १,५१,००० इतके सैनिक होते. त्यापैकी २३,००० सैनिक ब्रिटिश होते. यातील फक्त १०,००० सैनिक पंजाबच्या दक्षिणेला गंगेच्या खोऱ्यात होते. हिंदी शिपाई हे प्रामुख्याने आग्रा, औध, पंजाब या प्रदेशातील वरच्या वर्गातील म्हणजे हिंदुंधील ब्राम्हण जातीतील व मुसलमानांपैकी होते.

तेव्हा चालू परकीय राजवटीची आपत्ती दूर झाल्यानंतर जे सुखी सत्ययुग या देशात अवतारणार होते. त्या काल्पनिक सत्ययुगाच्या आकर्षणाबरोबरच निर्माण झालेल्या परकी सत्तेविरुध्दच्या क्षोभाचे पर्यवसान पुढे जेव्हा ब्रिटिशां-बरोबरच्या प्रत्यक्ष लढाईत घडून आले तेव्हा हिंदी जनतेपैकी फक्त ब्रिटिशांच्या नोकरीतल्या हिंदी शिपायांपाशीच काय ती शस्त्रे होती. तसेच हिंदी जनतेपैकी फक्त त्यानाच काय ते ती शस्त्रास्त्रे कशी वापरायची याचे व इतर लष्करी डावपेचाचे ज्ञान होते. याच डावपेचांच्या व शस्त्रास्त्रांच्या सहाय्याने ब्रिटिशांनी येथे हे एवढे मोठे राज्य मिळविले होते. वर आपण म्हटले की, ब्रिटिशांची राजवट येथे प्रस्थापित झाल्यानंतर ब्रिटिश धर्तीचा राज्यकारभार येथे सुरू होऊन येथील परंपरागत सांस्कृतिक आर्थिक व सांप्रदायिक जीवनरहाटिशी नव्या जीवनरहाटीचा झगडा सुरू झाला तर झगडयाची पहिली प्रत्यक्ष झळ शिपायाना लागली.

स्वतःचे सार्वभौमत्व अधिक भक्कम पायावर प्रस्थापित करण्यासाठी ब्रिटीशानी अनेक नवेनवे उपाय शोधून काढावयास सुरवात केली होती. येथील लोकांच्या जीवनावर याचाही विपरीत परिणाम होऊ लागला होता. परकी ब्रिटिश राजवटीमुळे मुळातच येथील लोकांच्या आयुष्यक्रमात कित्येक विसंगती

निर्माण होत होत्या. त्यातच या उपाय योजनांमुळे आणखी कित्येक विसंगतींची भर पडू लागली. किंवा हवे तर असे म्हणू या की, विसंगतींची तीव्रता प्रमाणाबाहेर वाढली.

हिंदी लोकांपैकी हिंदी शिपायांचा ब्रिटिशांवरोवरचा संवंध अधिक निकट असल्याने हिंदी शिपायाना तर या विसंगती अगदी छळूच लागल्या. या विसंगतीनी हिंदी शिपायाना एक जणू आम्हानच दिले. वेगळ्या शब्दात हीच गोष्ट सांगायची झाल्यास अशी सांगता येईल की, हिंदुस्थानी लोक आणि ब्रिटिश लोक या दोहोत जो सांस्कृतिक झगडा सुरू झाला होता, त्या झगड्याचा परिणाम हिंदी फौजेवर झाला आणि त्या फौजांचा ब्रिटिश लष्करातल्या केवळ भाडोत्री फौजा हे मुळचे स्वरूप पालटून गेले. या फौजा वा फलटणी आता केवळ लष्करी फलटणी नव्हत्या. आधीच संपूर्ण उत्तरेत आणि जवळपास प्रत्येक देशी जातीजमातीत ब्रिटिशांविरुद्धची भावना फोफावत होती. तशात ब्रिटिशांविरुद्ध सर्वत्र एक सामाजिक जाळे तयार होत होते. त्या सामाजिक जाळयांचे एकत्र मिळण्याचे ठिकाण म्हणजे या हिंदी सैनिकी फलटणी होत्या.

ब्रिटिश हिंदी फलटणीतले हे सैनिक म्हणजे हिंदुस्थानात कोठे काय घडे त्याचे जनतेसाठीचे वातमीदार होते. कोठे काय घडे ते या शिपायांच्याद्वारा गावोगाव कळे. तसेच गावोगावी जे घडे त्याची वातमी त्या त्या गावच्या शिपायांच्या द्वारे इतर शिपायांस कळे. १८५७ च्या उठावात हिंदी शिपाई अशा प्रकारे एक प्रधान महत्वाची सांस्कृतिक भूमिका वठवित होता; आणि शिपायाची ही भूमिका हे १८५७ च्या उठावाचे एक प्रमुख अंग होते गंमत म्हणजे या भूमिकेसाठी स्वत:च्या राजकीय सोयीसाठी जिचा पाया ब्रिटिशानी घातला ती सुलभ दळवळणाची आणि परस्पर संपर्काची नवी व्यवस्थाच या लोकांच्या कामी येत होती. वंगाली लष्कराने तयार केलेली सुलभ दळणवळणाची, परस्पर-संपर्काची व परस्परांच्या मदतीची व्यवस्था आणि त्या व्यवस्थेला पूरक म्हणून तयार करण्यात आलेल्या संपूर्ण तंत्रवैज्ञानिक व शासकीय सोयींसारख्या दुय्यम सोयींचा (उदा. लोहमार्ग, जमिनीवरचे पक्के रस्ते, टपाल आणि तारखात्याच्या सोई, वगैरे) वापर करून हिंदी शिपाई ब्रिटिशांविरुद्धचा येथील जनतेचा सांस्कृतिक क्षोभ खेडोपाडी पोचविण्याची कामगिरी पार पाडीत होता.

हिंदी शिपाई हा अशा प्रकारे खऱ्या अर्थाने राष्ट्रीय पुनरुज्जीवन चळवळीचा प्रणेता आणि प्रमुख साधन बनला होता. दुष्ट फिरंग्यांचे पाय या पवित्र भूमीला लागण्यापूर्वी जो वैभवशाली जीवनक्रम येथे चालू होता तो जीवनक्रम



अनुक्रमणिका



पुन्हा येथे आणण्यासाठी त्यांच्या मते ते ही चळवळ संघटित करीत होते. पुनरुज्जीवनवादी का, कशासाठी व कशाप्रकारे जन्म घेतात हे ज्याना माहित आहे त्याना या हिंदी चळवळीचे याच जातीच्या इतर ठिकाणच्या चळवळींशी असलेले साम्य लगेच पटेल. तसेच इतर ठिकाणच्या असल्या चळवळी व हिंदी चळवळ या दोहोत जे महत्वाचे तात्विक फरक होते तेही त्यांच्या ध्यानात येईल. यापुढचे आपली सगळी चर्चा याच फरकाशी संबधित आहे.

१८५७ च्या उठावात साध्या, सामान्य सैनिकी उमेदवारांचा कायाकल्प प्रचंड आवेशयुक्त सांस्कृतिक शक्तीमध्ये झाला होता. म्हणून या उठावाच्या संबंधातला आपला पहिला प्रश्न हा आहे की, हा चमत्कार कसा घडला? भाडोत्री शिपायांमधून संस्कृतीसाठी बलीदान करावयास उद्युक्त बनलेल्या शिपायांचा जन्म कसा होऊ शकला? कोठल्या विशिष्ट परिस्थितीमुळे हे घडून आले? १८५७ च्या उठावाचे खरे स्वरूप काय या विषयी इतिहासकारांमध्ये जरी एकमत नसले तरी हा उत्थान घडण्याला कोठली भौतिक परिस्थिती कारणीभूत झाली आणि ब्रिटिश धोरणांचा वाटा त्यात किती प्रमाणात होता या विषयी मात्र एखाद्याला आश्चर्य वाटावे असे एकमत त्यांच्यात आहे.

१७६४ साली दिल्लीच्या बादशहाचे फर्मान निघाले. या फर्मानावरहुकूम कंपनीला बंगाल प्रांताची दिवाणी मिळाली. आणि याच घटकेपासून कंपनीच्या कारभाराच्या सोयीसाठी आणि आर्थिक व व्यापारी फायद्यासाठी एतद्देशीय सांस्कृतिक धारा व संस्थांमध्ये पद्धतशीर बदल घडवून आणण्याचे अथवा या धारा व संस्थाना बुद्धिपुरस्पर डावलून बाजूला लोटण्याचे सत्र निहान येथील हिंदी लोकाच्या दृष्टीने तरी फार मोठया वेगाने ब्रिटिश राज्यकारभाराच्या पद्धतीत सुरू झाले होते. एकीकडे मूळच्या एतद्देशीय राज्यकारभाराच्या वहिवाटीत ब्रिटिशांकडन झपाट्याने बदल घडविले होते तर दुसरीकडे तितक्याच झपाट्याने हिंदी समाजात त्या झपाटयाचे प्रतिध्वनी उमटत चालले होते. पूर्वी मोंगल बादशहाचा कारभार असताना कारभाराच्या वहिवाटीत फेरफार करायचे झाल्यास त्या फेरफाराच्या योजनेत समाजातील विशिष्ट प्रतिष्ठित वर्गाना सामिल केले जात असे. त्याच्याशी सल्लामसलत करून हे फेरफार सरकार करी. ब्रिटिशानी ही वहिवाट बंद केली होती. ब्रिटिश कारभारी हिंदी जनतेतल्या या पूर्वीच्या बडया लोकाना अजिबात विचारीत ना. या पारंपरिक बडया लोकाना न विचारता हे फेरफार घडविले जात होते. याचा परिणाम असा घडला की, ब्रिटिशानी कारभारात केलेल्या नवीन बदलांचा चिमटा सर्वसामान्य हिंदी नागरिकाप्रमाणेच पूर्वीच्या दरबारी बडयानासुद्धा बसू लागला. शिवाय

या बड्याना हे बदल करताना विचारले जात नसल्याने एक प्रकारे त्यांचा सार्वजनिक अवमानसुद्धा या प्रकरणात घडत होता. कारण सार्वजनिक दृष्ट्या ही मंडळी दुर्लक्षित केली जात होती. या सर्व घडामोडीत महत्वाची गोष्ट ही होती की, ब्रिटिशांच्या दृष्टीने जरी हे सर्व बदल कायद्याच्या अंमलबजावणीच्या व शासकीय व्यवहाराच्या सोयीगैरसोयीच्या विचारातून केले जात होते तरी ज्या ज्या एतद्देशीय मंडळींच्या हितसंबंधाना व सुरक्षिततेच्या भावनेला त्या बदलांमुळे झळ पोचत होती त्याना ब्रिटिशांच्या खऱ्या हेतूंबद्दल शंका वाटून हे बदल म्हणजे आपल्या धर्मावर व संस्कृतीवर परकी आक्रमण आहे असे वाटत होते.

हिंदू लोकातील सतीची चाल वा त्यांच्यातली जातीसंस्था या सारख्या संस्था म्हणजे हिंदू संस्कृतीची ठळक अंगे होती. १९ व्या शतकातील इंग्रजाच्या दृष्टीने त्या जरी कितीही रानटी व निंद्य असल्या तरी भारतीय संस्कृतीच्या त्या पुरातन आणि अविभाज्य रूढी असल्याने हिंदू लोकांच्या धार्मिक भावनेशी त्या एकजीव बनल्या होत्या.

कलकत्याच्या आपल्या राजधानीच्या शहरातून कंपनी सरकारने काही थोड्या सामाजिक सुधारणा प्रसृत केल्या होत्या. ब्रिटिशी जीवन रहाटीशी दीर्घकाळ व खोलवर संबंध असणाऱ्या आधुनिकतावादी बंगाली बुद्धिवाद्यानी-सुद्धा याच सामाजिक सुधारणांची मागणी चालविली होती. मात्र हे सगळे खरे असले तरी बंगालबाहेरच्या बहुसंख्य जनतेला या सुधारणा पसंत नव्हत्या. थोडक्यात असे म्हणता आले असते की, ज्या जागेवर कंपनी सरकारचे मुख्य सरकारी ठाणे होते त्या जागेच्या अवतीभवती हिंदी संस्कृती व ब्रिटीश संस्कृती या दोन संस्कृतीच्या एकत्रित संपर्कांतून तयार झालेला एक वेगळाच सांस्कृतिक सलग पट्टा जरी पाहण्यात येत होता तरी मुख्य ठाण्यापासून जसजसे दूर जात जावे तसतसा हा पट्टा पातळ बनल्याचे दिसत होते. मुख्य सरकारी ठाणे आणि गंगेचे वरचे खोरे यातील नव्या संस्कृतीधारकांचे प्रमाण तर नगस्तच म्हणता आले असते. म्हणजेच असे की, देशाच्या अंतर्भागातल्या लोकांच्या मनावर ह्या बदलत्या सांस्कृतिक वातावरणाचा काहीही परिणाम घडला नव्हता. साहजिकच कायद्याच्या जोरावर जे काही सांस्कृतिक फेरफार ब्रिटिशानी येथील सांस्कृतिक जीवनक्रमात घडून आणले ते तेथील हिंदी लोकाना तीव्रतेने टोचले. आणि त्याची प्रतिक्रियादेखील तशीच तीव्र झाली. महत्वाची गोष्ट म्हणजे बंगाली लष्करातले शिपाई मुख्यत: याच भागातून आलेले होते. बदलती संस्कृती जेथे पोहोचली नव्हती त्या गंगेच्या खोऱ्यातून आलेल्या या शिपायाना हे नवे बदल

फारच प्रखरतेने जाणवले. चौधरींनी म्हटले आहे की, "१८५७ च्या उठावात असे चित्र दिसते की, ही राजवट जेथे अल्पकाळ जारी होती तेथील लोकांचा तिच्याबद्दलचा दुस्वास फार मोठ्या प्रमाणावर होता उलट हीच राजवट जेथे दीर्घकाळ चालू होती तेथील लोकांचा ब्रिटिशांना अगदी कमी विरोध होता. किंवा ब्रिटिशांना घालवून देण्यात त्यांना फारसा रस नव्हता"[८]

ब्रिटिशांना अनेक दिशांकडून विरोध होऊ घातला होता. अनेक गटांचा त्यांच्याविरुद्ध असंतोष झाला होता. ब्रिटिश अंमलदारांविरुद्धचा शिपायांचा असंतोष हे त्यातील एक उदाहरण. ब्रिटिशांवर असंतोष दाखविणारे आणखी-मुद्दा इतर लोक होते. शिपाई ब्रिटिशांवर का संतापले याची कारणमीमांसा मागाहून करू. प्रथम असंतोषाच्या दुसऱ्याच एका प्रकरणाचा विचार करू.

अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात आणि एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात येथील पूर्वापार सत्तांपैकी अनेक सत्ता स्वत:चे वर्चस्व प्रस्थापित करण्यासाठी प्रांतोप्रांती आपापसात लढत होत्या. या लढायांच्या अंतीम परिणामात एक प्रबळ राजकीय सत्ता म्हणून ब्रिटिश येथे उदयास आले. परंतु हे घडण्यापूर्वी येथील अनेक छोटयामोठ्या राजांचा त्या संघर्षात बळी गेला. लढायात हे राजे हरून त्यांचे सर्वस्व गेले होते. हे सगळे पराभूत राजेरजवाडे ब्रिटिशांवर रूष्ट होते.

येथील जे कोणी देशी राजेरजवाडे ब्रिटिशांना पुढेमागे त्रासदायक ठरण्यासारखे होते त्यांचा बंदुकीच्या नळीच्या जोरावर आणि कटकारस्थानांच्या सहाय्याने बंदोबस्त करून टाकल्यावर सगळ्या पराभूत राजेलोकांवर आणि त्या त्या प्रदेशातल्या मातबरांवर स्वत:चा अंमल प्रस्थापित करण्याचे काम कंपनीने हाती घेतले. आता या लोकांचा कायम बंदोबस्त करणे कंपनीला आवश्यक झाले होते. कारण या देशी मातबरांचा दोन प्रकारचा अंमल सामान्य नागरिकांच्या मनावर होता. एकतर त्यांनी त्यांच्यावर एवढी वर्षे राज्य केले होते. व दुसरे म्हणजे समाजातील मातबर पुढारी म्हणूनही त्यांनी त्यांच्यावर नैतिक वर्चस्व गाजविले होते.

सामान्य लोकांच्या मनावरचे या मातबरांचे हे दुहेरी वर्चस्व नष्ट करण्यासाठी व त्यांचा बंदोबस्त करण्यासाठी कंपनीने जमीनीचा महसूल जमा करण्या-

---

८ एम. बी चौधरी, "द यूनियन ऑफ द सिव्हिल अँड मिलटरी रिबेलिअन्स" इन इंडिया १८५७. आइन्सिले टी एंब्री यानी संपादित केलेल्या ग्रंथात (बोस्टन : डी सी हिथ १९६३) पृ. ६६

च्या पद्धतीत नवी शिस्त आणली. कंपनीने असे ठरवून दिले की, ज्या कोणा वर्गाला आर्थिक विशेषाधिकार आणि हक्क होते ते अधिकार व हक्क आणि त्यातून मिळणारे सामाजिक फायदे जर त्याना पुढेसुद्धा टिकवून ठेवायचे असतील तर त्यासाठी त्यानी सरकारी महसूल वेळच्या वेळी सरकारात भरावयास हवा; तसेच आपापल्या विभागात राजकीय शांतता राखावयास हवी. जर त्यांनी हे केले तरच त्यांचे राजकीय हक्क व त्या हक्कांबरोबर मिळणारा सामाजिक मान कंपनी टिकू देईल. हा नवीन कायदा लावून कंपनी सरकारने या मातब्बर मंडळीस अगदी धारेवर धरले होते.

जुन्या मातब्बर राजेरजवाड्यांचा आणि श्रेष्ठांचा बंदोबस्त करण्याचा आणखीसुद्धा एक मार्ग कंपनीने शोधून काढला होता. स्वतःच्या वतनाच्या पारंपरिक प्रदेशात राहू दिल्यास ज्यांच्यापासून स्वतःला राजकीय उपद्रव होण्यासारखा होता त्यांची त्यांच्या वडिलोपार्जित प्रदेशातून कंपनीने उचलबांगडी केली. आणि स्वतःच्या हक्काच्या प्रदेशापासून खूप दूर असलेल्या प्रदेशात राहावयास त्याना भाग पाडले. काहींचा वारसाहक्काचा अधिकार नाकारण्यात आला व तसे करून त्यांची राज्ये खालसा करण्यात आली. "राज्ये खालसा करण्याच्या" ह्या घटनेचा अर्थ एवढाच होता की, स्वतःच्या संस्थानचा कारभार या लोकाना चालविता येत नाही असे कंपनीला वाटले होते किंवा कंपनीला मान्य होऊ शकण्यासारखा वारस त्या राज्याना नव्हता. कंपनीच्या मते ज्या राज्यांचा कारभार योग्य प्रकारे चालत नव्हता किंवा कंपनी मान्यता देऊ शकेल असा वारस जे दाखवू शकत नव्हते ती राज्ये खालसा करण्याच्या लायकीची ठरली होती. अशा राज्ये खालसा करून ते ते प्रदेश कंपनी स्वतःच्या अंमलाखालील प्रदेशात सामावून घेणार होती. ज्या राज्यांवर ही आपत्ती कोसळली होती त्याना अर्थातच हा सर्व प्रकार अन्यायकारक वाटत होता. विशेषतः हिंदी सांस्कृतिक व राजकीय परिपाठ विचारात घेता तर कंपनीचे हे कृत्य फारच अन्यायकारक वाटण्यासारखे होते. हिंदुस्थानात राज्य करण्याचा वा जनसामान्यांवर नैतिक श्रेष्ठत्व गाजविण्याचा अधिकार असे दोन्ही अधिकार व्यक्तिगत कर्तृत्व वा कारभारातील कार्यक्षमता यावर अवलंबून नसतात. इस्ट इंडिया कंपनीच्या प्रतिनिधिना मात्र तसे वाटत होते हिंदुस्थानात राज्य करण्याचा वा सार्वजनिक श्रेष्ठत्वाचा असे दोन्ही अधिकार अनुवंशिकतेच्या कायद्याने मिळतात. तेव्हा जेथले या प्रकारचे कायदे अजिबात वेगळे होते तेथे ब्रिटिशांनी व्यक्तिगत कर्तृत्वावर व कार्यक्षमतेवर अवलंबून असणारे स्वतःचे कायदे जारी करणे व तेथल्या मूळ पदस्थांचे वंशपारंपारिक हक्क काढून घेणे म्हणजे अन्यायाचा कहर असे

जर त्याना वाटले तर त्यात नवल नव्हते. त्यांत आणखी गंमत अशी की, प्रतिस्पर्ध्याबरोबरसुद्धा न्यायाने वागायचे हा जो ब्रिटिशांचा उदात्त स्वभाव व खाक्या होता त्याचा परिणाम येथे नेमका उलटा होऊन परिस्थिती अधिकाधिक चिघळत होती. ब्रिटिशांच्या जागी जर कोणी वेगळे परकी सत्ताधारी असते तर त्यानी पराभूत संस्थानिकाना पार चिरडूनच टाकले असते. त्यांची राजकीय प्रतिष्ठा व अधिकार त्या सत्ताधाऱ्यानी मुळातून उखडून टाकला असता. परंतु ब्रिटिश इतक्या एकांतिक टोकाला गेले नाहीत. त्यानी संस्थानिकाना अनेक सवलती आपणहून दिल्या. त्यानी त्याना स्वतःची प्रचंड मालमत्ता, धनदौलत व कधीकधी तर स्वतःचा अफाट लवाजमा व नातेवाईकांचा ताफा स्वतःबरोबर ठेवण्याची मुभा दिली. कंपनी संस्थानिकांच्या तिजोरीवर नजर ठेवीत होती. परंतु उत्पन्नाचा बराच मोठा भाग संस्थानिकाना त्यांच्या स्वतःच्या खर्चासाठी ठेवू देखील देत होती. फक्त राजकारण करण्यावर काय तो त्यांच्यावर प्रतिबंध लादण्यात आला होता. इतक्या सगळ्या सोयी बंडखोराना हाताशी लाभल्याने असंतुष्ट राजरजवाड्यात, यात दिल्लीच्या मोंगल दरबारातील मंडळीसुद्धा मोडत होती बंगाली लष्कर, प्रांतोप्रांतीचे नाराज व आता सत्ताभ्रष्ट बनलेले एके काळचे उच्चपदस्थ, त्याचप्रमाणे जुन्या इस्लामी जीवनपद्धतीचे पुनरुज्जीवन करण्याची मनिषा बाळगून असलेले वाहाबी पंथीय कडवे धार्मिक मुसलमान या सर्वांमध्ये ब्रिटिशविरोधी भावनेचे व कटाचे जाळे त्याना विनासायास पसरविता आले

अशातच ब्रिटिशांकडून अशी निदान चार कृत्ये घडली की, ज्यांचा विचार करता हिंदी संस्थानिकाना असे खात्रीपूर्वक वाटू लागले की, ब्रिटिशाना आपणास पूर्णपणे नामोहरम करायचे आहे. ही चार कृत्ये म्हणजे पुणे, झाशी, औंध आणि दिल्ली येथील राजघराण्याना ब्रिटिशांकडून मिळालेली वागणूक.

रोमन साम्राज्य नष्ट झाले तरी पोपची नामधारी सत्ता जशी पुढेही टिकून राहिली होती तशाच प्रकारे ज्याला खऱ्या अर्थाने मोंगलांचा बादशहा म्हणता आले असते तो औरंगजेब बादशहा मरण पावल्यानंतरसुद्धा पुढील दिडशे वर्षे मोंगलांची नामधारी सत्ता दिल्ली येथे टिकून राहिली होती. दिल्लीची मोंगल राजवट हा या देशातल्या सांस्कृतिक व राजकीय क्षेत्रातल्या वादांमधील अखेरचा शब्द होता. आपला अधिकार वैध आहे हे ठरवून घेण्यासाठी सगळ्या प्रकारचे स्थानिक व प्रांतिक वादी-प्रतिवादी शेवटी मोंगल दरबाराकडे वळत आणि स्वतःच्या हक्काच्या वैधतेचे बादशाही शिक्कामोर्तब मिळवून परत जात.

स्वतःच्या कुवतीवर कंपनीने बंगाल प्रांत जिंकला होता. परंतु स्वतःच्या राजवटीला अधिकृत मान्यता मिळवून घेण्यासाठी क्लाईव्हला दिल्लीच्या बादशहाकडे वळावे लागले होते हे आपण मागे पाहिले आहेच ! तथापि दुसऱ्या बहादुरशहाचा ( दिल्लीच्या गादीचा त्या वेळचा अंध परंतु सौंदर्यप्रेमिक मालक ) वारसदार युवराज मरण पावताच कंपनी सरकारने जाहीर करून टाकले की, येथून पुढे बादशहाच्या पश्चात दिल्लीचे राज्य खालसा केले जाणार आहे. या वार्तेबरोबर दिल्ली दरबारात ब्रिटिशविरोधी संताप आणि आश्चर्य दोन्हीही उसळली कारण दिल्ली दरबारचा युवराज मरण पावल्यावर बादशहाच्या इतर समांतर भाऊबंदाना व त्यांच्या बरोबरच्या लव्याजम्यांना असे वाटू लागले होते की, ज्य: अर्थी बादशहाला दुसरा औरस वारस नाही त्या अर्थी दिल्लीची बादशाही आपल्या वाटचाला येण्याची शक्यता आहे. परंतु कंपनी सरकारच्या वरील जाहीर धोरणामुळे त्यांच्या त्या आशेवरच पाणी पडले.

ज्या चार घटनांमुळे ब्रिटिशांच्या सद्हेतूंबद्दल येथील संस्थानिकाना शंका वाटू लागली होती त्यातील ही पहिली घटना होय. दुसरी घटना अशी. मराठा राज्याचा पेशवा दुसरा बाजीराव याला १८१७ मध्ये पराभूत केल्यावर ब्रिटिशानी त्याला पुण्याहून हालवून पुण्यापासून हजार मैल उत्तरेकडे असलेल्या कानपूरनजिक गंगेच्या काठी स्थायिक बनवून ठेवले होते. दुसरा बाजीराव १८५१ मध्ये वारला व त्याचा दत्तकपुत्र नानासाहेब हा पेशवेपदाचा वारस बनला. परंतु कंपनी त्याचा हा हक्क मान्य करीना. कारण कंपनीने त्याला पेशवेपदाची मुद्रा वापरण्यास मना केले. एवढेच नव्हे तर त्याच्या हयातीनंतर पेशवे घराणे पुढे चालू ठेवता येणार नाही असेही त्यानी त्याला कळवून टाकले.

ब्रिटिशांच्या खऱ्या हेतूंबद्दल शंका निर्माण करणारी तिसरी घटना अशी. ही घटना झाशी संस्थानशी निगडीत आहे. दत्तकाची परवानगी नाकारून कंपनी सरकारने १८५४ मध्ये झांशीचे संस्थान ब्रिटिश प्रदेशात विलिन करून टाकले. दत्तक अज्ञान असल्याने झाशीची राणी राज्याचा कारभार पाहात होती. पण कंपनी सरकारने जबरदस्तीने तिला झाशीचे राज्य खाली करावयास भाग पाडले. राणी थेट लंडनपर्यंत भांडली. परंतु तिचे काहीही चालले नाही. तिचा निषेध आणि विरोध ठोकरून लावून तिला निवृत्तीवेतन लागू करण्यात आले.

चवथी घटना अशी, औधचा नबाब वजीद अल्ली शहा याला कंपनी सरकारने पदच्युत करून कलकत्त्याला हद्दपार केले होते. औध हे मोंगल

साम्राज्यापैकी एक महत्वाचे राज्य (औधचा नबाब म्हणजे पुराण्या मोगल बादशाहीच्या महत्त्वाच्या भागाचा काही प्रमाणातला का पण एक शेवटचा स्वतंत्र वारसदार औधचा नबाब ही मोंगल साम्राज्याच्या महत्वाच्या प्रदेशातला शेवटचा पुरुप स्वतंत्र होता.) औधचा कारभार बरोबर नाही, तेथे सर्वत्र अंदाधुंदी आहे या सबबीखाली कंपनी सरकारने १८५६ साली हे राज्य खालसा करून सरकारजमा केले.

औरस वारस नाही किंवा दत्तक वारस आपणास मंजूर नाही या सबबीखाली कंपनीचे हिंदी साम्राज्य वाढविण्याचे घोरण आखणाऱ्या गव्हर्नर जनरल डलहौसीच्या या शेवटच्या कृत्याने तर येथील सगळया पूर्वापार जुन्या वतनदार मंडळींची खात्रीच पटली असणार की, आपण जर झटपट काही आततायी धडपड केली नाही तर जुन्या परंपरेने जे अनुवांशिक विशेषधिकार व सोयी सवलती आपणाला दिल्या आहेत त्याही नाहीशा होऊन जातील. एवढेच नव्हेतर हा क्षण जर आपण साधला नाही तर पुढे कधीतरी हे अधिकार व मानमरातब आपण परत मिळवू ही आशासुद्धा आपणाला आताच टाकून द्यावयास हवी.

ब्रिटिशांच्या येथील धोरणाने एकूण मूलभूत बाबींवर आघात केला गेला होता. एकतर येथील कित्येक मातब्बर मंडळींच्या आनुवांशिक वारसाहक्कांवर त्यानी गदा आणली होती (राजेपण हे आनुवंशिक हक्काने प्राप्त होते ही समजूत संपूर्ण जगभर आढळते.) दुसरी गोष्ट अशी की, हिंदी राजेशाहीच्या कल्पनेच्या मूळावरच ब्रिटिशानी आपल्या घोरणाने व वागण्याने घाव घातला होता. हिंदुस्थानात कोठल्याही हक्काच्या वैधतेचा अंतिम निकष राजा असतो. हा हक्क त्या कुणाला आहे किंवा नाही हे राजा ठरवितो. राजाने आपली संमती दिल्यावाचून कोठलेही पद कायदेशीर बनू शकत नाही. तसेच राजा हा धर्माचा शास्ता व आधार मानला जात होता. ब्रिटिशानी राजेपणाचे हे हक्क उडवून लावले. त्यामुळे हे करण्यात ब्रिटिशांचा काही अंतस्थ कावा असून, हिंदी वरीष्ट वर्गाचा राजकिय व सांस्कृतिक पाया उखडून काढून त्या वर्गाला कायमचे नामशेष करण्यासाठी ब्रिटिश हे सव करीत आहेत असे या मंडळींना वाटू लागले.

याच दरम्यान ब्रिटिशानी आपल्या सुधारणावादी धोरणाचा रोख बहुजन समाजाकडे वळविला. आणि बहुजनसमाजाच्या आयुष्यक्रमात बदल घडवून आणण्याचे ठरविले. असे करण्यात बहुजनसमाजाचा आयुष्यक्रम सुधारावा, त्यांची स्थिती बदलावी असाही प्रामाणिक हेतू कदाचित ब्रिटिशांचा असावा. अथवा शासन आणि व्यापारउद्योगाची यंत्रणा अद्यावत करण्यासाठीसुद्धा ती पाउले त्यानी उचलली असतील. या कार्यक्रमामागचा हेतू काही का असेना,

ब्रिटिशांच्या त्या प्रयत्नांचा परिणाम एवढाच झाला होता की, ब्रिटिश अंमला-खाली आपली संस्कृती लयास जाणार अशी भीती हिंदी जनतेस वाटू लागली

आम्ही वर आधीच म्हटले आहे की, सतीची चाल बंद करावी आणि जातीसंस्थांच्या दुष्परिणामांवर कसली ना कसली बंधने सरकारने आणावी अशा प्रकारची विनंती तर बंगालमधल्या वरिष्ट वर्गीय सुधारणावादी गटानेदेखिल ब्रिटिशांकडे केली होती. कंपनी सरकारने मुख्यतः एवढेच केले होते की, सुधारकांच्या त्या विनंतीस स्वतःची संमती दिली. तथापी ज्या हिंदी लोकांची या जुन्या रुढींवर ठाम श्रद्धा होती त्या बहुसंख्य लोकाना त्यांच्याच लोकांच्या विनंतीवरून लादण्यात आलेली बंधने व करण्यात आलेल्या सुधारणा म्हणजे ब्रिटिश लोकांचे त्यांच्या धर्म व संस्कृतीवरचे आक्रमण वाटले. ब्रिटिशानी ठगीचा विमोड केला.[९] समाज भितीमुक्त आणि निर्भय असण्याच्या दृष्टीने हे कृत्य अगदी स्तुत्य होते. परंतु काही गोटात ब्रिटिशांच्या या परोपकारी कृत्याचा-देखिल विपरीत अर्थ लावला गेला.

ख्रिस्ती धर्मप्रचारकाना पुढे जेव्हा हिंदुस्थानात येऊन कंपनीच्या संरक्षणा-खाली ख्रिस्ती धर्माचा प्रचार करण्याची गर्भित परवानगी मिळाली तेव्हा तर ब्रिटिशानी चालविलेल्या सांस्कृतिक आक्रमणाबद्दलचा तिटकारा आणखीनच वाढला. एकूण ब्रिटिश जनता, त्या जनतेची येथील लोकांकडे पाहाण्याची सर्व-साधारण धारणा व त्या धारणेच्या परिणामांती कंपनीच्या नोकरवर्गाचा येथल्या लोकांकडे पाहाण्याचा दृष्टीकोन या सर्वामुळे सुद्धा ब्रिटिशांविरुद्धचा येथील जनतेचा राग वाढत होता. इंग्लंडमधील इंग्लिश जनता व त्यांचा येथील नोकरवर्ग दोन्हीही येथील जनतेकडे तुच्छतेच्या दृष्टीने पाहात. त्यांच्या मते येथील लोक व त्यांचे आचारविचार म्हणजे नतद्रष्टपणाचा कळस होता. आणि त्यांच्यामध्ये सुधारणा घडवून आणण्यासाठी जणू काही नियतीने त्यांची नियुक्ती केली होती.

हिंदुस्थानातील लोक व त्यांचे आचारविचार अगदी नीच प्रतीचे असून त्यांच्यात सुधारणा घडवून आणण्यासाठी व त्यांचा उद्धार करण्यासाठी जणू परमेश्वरानेच आपली नेमणूक केली आहे ही जी इव्हेन्जेलिकल धर्तीची ख्रिस्ती घमेंड एकूण इंग्लिश जनता व येथील तिचे प्रतिनिधी म्हणजे कंपनीचे येथले

---

(९ ठग हे एका विशिष्ट प्रकारचे लुटारु होते. ते कालीमातेचे उपासक असत. लुटमार करण्याची त्यांची स्वतःची खास पद्धत असे. ज्याला लुटायचे त्याचा प्रथम मोठ्या कौशल्याने ते विश्वास संपादित करीत व मागाहून विश्वास-घाताने त्याच्या गळाला रेशमी दोरीचा गळफास लावून त्याचा जीव घेत व त्याची चीजवस्तू लुटून घेत.)



अनुक्रमणिका



नोकरदार मिरवित होते ती सुद्धा येथील लोकाना बोचक होत होती. किंबहुना ब्रिटिशांची स्वतःच्या श्रेष्ठत्वाबद्दलची व परोपकारीपणाबद्दलची ही घमेंड उत्तरोत्तर वाढतच चालली होती. त्यामुळे आधीच्या आगीत कोणी तेल ओतावे तसा ब्रिटिशांविरुद्धचा हिंदी मनुष्याचा क्रोध वाढत चालला होता. मायकेल एडवर्डस् यानी लिहिले आहे की, " धार्मिक संस्काराने अथवा पुण्यकृत्ये केल्याने नव्हे तर येशू ख्रिस्तावर श्रद्धा ठेवल्यानेच मनुष्यप्राणी वाचतो या जातीच्या प्रचारकवादी ( इव्हेन्जेलिकल ) ख्रिस्तीपणाखाली वावरणाऱ्या १८२० नंतरच्या कंपनीच्या अधिकारीवर्गाला येथील लोकांची प्रत्येक गोष्ट पापात जमा असल्यासारखी वाटे. "[१०] एडवर्डस् पुढे म्हणतात की ही " भूमी केवळ शत्रूवत आहे. या भूमिकेचा परिणाम अनेकांच्या विवेकबुद्धीवर झाला. हिंदुस्थानाबद्दल आधीच त्यांच्या मनात द्वेष होता त्यात आता भर पडली. हिंदुस्थानच्या विरूद्ध ब्रिटिश जनतेमध्ये मधून मधून जो उन्मादवायु पसरत असे त्याचेही मूळ याच परिस्थितीत होते "

" जे जे हिंदुस्थानी त्याचा त्याचा तिरस्कार ही १८५० पर्यंतची ब्रिटिशांची जणू जीवनपद्धतीच बनून राहिली होती. या त्यांच्या कर्तव्यदक्षतेला त्यांच्या लढाऊ बाण्याच्या ख्रिस्तीधर्माचा पूर्ण पाठिंबा होता. १८५७ पर्यंत हिंदुस्थानातल्या प्रत्येक ब्रिटिश अधिकाऱ्याला असे वाटू लागले होते की, हे सगळे हिंदी लोक म्हणजे पापाचे निव्वळ मेंढरणीच असून त्याना सुधारुन सुसंस्कृत ख्रिस्त्यांसारखे बनवून मांडणे हे ब्रिटनचे आद्य-कर्तव्य आहे."[१०]

अर्थात हिंदी लोकांमधील जी तीक्ष्ण बुद्धीची मंडळी होती त्याना ब्रिटिशांच्या त्यांच्याविषयीच्या तिरस्कार भावनेचा अंतिम सांस्कृतिक परिणाम काय होणार आहे याची स्पष्ट कल्पना केव्हाच येऊन चुकली होती. विशेषतः त्याच्या सभोवार ज्या घटना घडत होत्या त्यामुळे भविष्याबद्दल त्यांच्या मनांत जी शंका येत होती तिला दुजोराच मिळत चालला होता. पूर्वीच्या आमदानीत स्वतःचा धर्म टाकून दुसऱ्या धर्मात प्रवेश करणाराला वडिलोपार्जित मालमत्तेवरचा स्वतःचा हक्क सोडून द्यावा लागत असे परंतु १८५० मध्ये जो २१ व्या क्रमाकाचा कायदा करण्यात आला त्या कायद्यान्वये स्वतःचा जन्मजात धर्म टाकून देऊन एखाद्याने जर ख्रिस्ती धर्म स्वीकारला तरीसुद्धा त्याला त्याच्या वडिलोपार्जित मालमत्तेचा वाटा मिळू शकणार होता विधवा स्त्रीच्या पुनर्विवाहासंबंधीचा कायदा बंडाच्या आधीच केला गेला होता. (मात्र त्याची

---

१० एडवर्डस - पृ. ५१

अंमलबजावणी बंडानंतर सुरू झाली. ) या कायद्याने मनातनी हिंदुधर्माच्या अधिकारालाच आव्हान दिले. भुयारी आणि रेल्वेरस्ते बांधताना येथील अनेक लोकांच्या पवित्र स्थानांवर अतिक्रमण घडून आले होते. अनेक ठिकाणी तर या रस्तेबांधणीच्या योजनेत पवित्र वास्तू मूळ जागेवरुन हालवून दुसऱ्या जागी न्याव्या लागल्या होत्या. जातीभेदांचा सगळा गुंता सुरक्षित राखून कमी भाड्यात रेल्वेप्रवास आखता येणे शक्य नव्हते. त्यामुळे रेल्वेप्रवासात निरनिराळ्या जातीधर्मांच्या लोकाना एकमेकांचा वाट लागणे अपरिहार्य होते. परंतु या अटळ परिस्थितीचा अर्थ असा लावण्यात आला की, ब्रिटिश हा सर्व बनाव मुद्दामच घडवून आणीत आहेत. कारण त्याना जातीभेद कमकुवत करून शेवटी सवगोलंकार घडवायचे आहे. आणि म्हणून त्यानी हा सगळा कट रचला आहे. इंग्रजांच्या तुरुंगात जातपात विचारात घेतली जात नव्हती. सर्व कैद्याना एकत्र जेवण घ्यावे लागे. तसा ब्रिटिशांचा कायदाच होता. तसेच रुग्णालयातसुद्धा जातीभेद पाळू दिले जात नसत आणि पडदाही पाळता येत नव्हता. यासुद्धा परिस्थितीचा व ती परिस्थिती निर्माण करणाऱ्या ब्रिटिशांच्या कायद्यांचा वरील सारखाच अर्थ लावला गेला.

या सगळ्या घडामोडी वस्तुतः अलगपणे घडत गेल्या होत्या. परंतु त्यांचा एकत्रित परिणाम विचारात घेता ती जणू काही एक प्रचंड घटना होती असेच वाटत होते. आणि हाच या सर्व घडामोडीतला महत्वाचा मुद्दा होता. या घटना प्रत्यक्षात वेगवेगळ्या असतील पण येथील लोकांच्या दृष्टीला सर्व मिळून ती एक घटना आहे व ब्रिटिशानी कट करून ती घडवून आणली आहे असे वाटत होते.

ब्रिटिशानी या देशात जी धोरणे आखली व जी काही कृत्ये केली त्यामुळे येथील लोकांच्या ठिकाणी एक निकराची अशी मानसिक अवस्था उत्पन्न झाली. या काळात येथे एक सांस्कृतिक आणिबाणीची परिस्थितीच निर्माण झाली होती असे हवे तर म्हणाना ! परंतु ब्रिटिशांनी ते बुद्धिपुरस्पर केले नव्हते. सांस्कृतिक बाबीत लोकांचा छळ करावा असे ब्रिटिशांचे धोरण नव्हते. वा अशा प्रकारे हेतुपूर्वक एखादे कृत्यही त्यानी केले नव्हते. तसेच हिंदी लोकांचा अवमान करून त्यांच्या स्वाभिमानावर आघात करावा असा बुद्धया प्रयत्नसुद्धा ब्रिटिशानी कोठे केला नव्हता असे असूनसुद्धा एका मागोमाग एक ज्या घटना येथे घडत गेल्या त्यांचा अर्थ लावताना हें सर्व काही आमची संस्कृती नष्ट करण्याच्या गुप्त हेतूनेच ब्रिटिश करीत आहेत असे हिंदी लोकानी ठरविले.

ब्रिटिशांविरुद्ध हिंदी लोकांनी कट करून १८५७ चा उठाव घडवून आणला या प्रकारचा तर्क ब्रिटिश व हिंदी अशा दोन्ही बाजूच्या इतिहासकारानी मांडला



अनुक्रमणिका

आहे परंतु आपण जी भूमिका उर घेतली आहे तिचा लवलेशही त्यांच्या तर्कात आपणास आढळणार नाही. येथील जनतेने ब्रिटिशांच्या विरुद्ध कट केला व त्यातून १८५७चे बंड घडून आले असे जेव्हा म्हटले जाते तेव्हा ते म्हणणाऱ्यांच्या हे ध्यानात येत नाही की, येथील जनतेलादेखिल ब्रिटिशानी आपल्या विरुद्ध कट चालविला आहे असेच वाटत होते. हिंदी जनतेला असे वाटत होते की, ब्रिटिश सैनिक, ख्रिस्ती धर्मप्रसारक संस्था या दोघांच्या मदतीने इस्ट इंडिया कंपनी आपल्या धर्मांच्या व संस्कृतीच्या विरुद्ध कट करीत आहे. सारांश ब्रिटिशांच्या दृष्टीने हिंदी लोक त्यांच्याविरुद्ध कट करीत होते. तर हिंदी लोकांच्या दृष्टीने ब्रिटीश लोक हिंदी लोकांच्या विरुद्ध कट करीत होते.

ब्रिटिशावर रुष्ट असणाऱ्या काही हिंदी मंडळीनी, विशेषतः हिंदी राजे-रजवाडे यानी ब्रिटिशांविरुद्ध कट केला तर ते समजण्यासारखे व मान्य होण्यासारखे आहे. मात्र संपूर्ण पुरावा पाहता कट करून हे बंड घडले नव्हते असेच म्हणावे लागेल कारण ब्रिटिशानी ज्या अनेक प्रकारच्या कारवाया केल्या त्यामुळे येथील प्राचीन सांस्कृतिक चौकटीला धक्का पोचून ती ढासळू लागली होती. जेव्हा एखाद्या स्वतंत्र संस्कृतीमध्ये असे काही घडते म्हणजे बाह्य आक्रमणाने त्या संस्कृतीला तडे जाऊ लागतात तेव्हा त्या संस्कृतीतला बहुजन-समाज स्वतःच्याच मनाची स्वप्ने रंगवू लागतो. व लवकरच आपल्या संस्कृतीला उत्तम काळ येणार आहे कारण काही तरी दैवी चमत्कार घडून आक्रमकांचा नायनाट घडून येईल असे मानू लागतो. ही स्वप्ने रंगविता रंगविता असा क्षण येतो की, ती स्वप्ने आहेत हेच तेथील जनता विसरून जाते व त्या स्वप्नांच्या खरेपणाचा हवाला स्वतःच स्वतःला देऊन जुलमी सत्तेविरुद्ध दंड थोपटण्यास उद्युक्त होते. आक्रमकाना आव्हान देऊ पाहते.

१८५७ साली हिंदुस्थानातदेखील हेच घडले होते. हिंदी लोकाना त्या काळात असे वाटू लागले होते की, ज्या अर्थी आज आपण दुर्दैवाचे टोक गाठले आहे त्या अर्थी उद्या आपले भाग्य उजळणार आहे. आणि उद्या आपले भाग्य उजळून निघणार आहे हे भविष्य जर खरे करावयाचे असेल तर त्यासाठी आपल्या देशात घुसलेल्या या परक्या, जुलमी आक्रमकाना देशाबाहेर हाकलून काढले पाहिजे. आपले हे प्रयत्न हमखास यशस्वी होणार आहेत कारण तसे आपल्या भविष्यातच लिहिलेले आहे. भविष्यदेवताच तसे सांगत राहिली आहे. हिंदी लोक वर म्हटले त्या विशिष्ट प्रकारच्या स्वप्नाने भारले गेले असल्यानेच ब्रिटिशांविरुद्धच्या उठावात मोठ्या संख्येने सामील झाले होते.

हिंदी आणि ब्रिटिश सांस्कृतिक आचार–विचारात खूपच तफावत होती. या तफावतीची झळ येथील सर्वच हिंदी लोकाना पोचत होती. परंतु ब्रिटिश लष्करातल्या हिंदी शिपायाला तिचा जेवढा त्रास होत होता तेवढा सामान्य हिंदी नागरिकाला होत नव्हता सांस्कृतिक आचारविचारातील तफावतीचे सगळे वादळ एखाद्या प्रचंड दगडासारखे शिपायांच्या डोक्यावर कोसळले होते.

ब्रिटिश लष्करात हिंदू होते, तसेच मुसलमान, शीख हेसुद्धा होते. हिंदू, मुसलमान व शीख शिपाई मिळून ब्रिटिश इस्ट इंडिया कंपनीच्या लष्कराचा एक मोठा भाग तयार झाला होता. या शिपायांवर धंदेवाईक ब्रिटिश सेनाधिकारी अंमल चालवित. आपल्या हाताखालच्या शिपायानी ब्रिटिश लष्करी कायद्याप्रमाणे वागलेच पाहिजे असे या अधिकाऱ्याना वाटत होते. हिंदी शिपायानासुद्धा ब्रिटिश कायदे लागू आहेत या नियमाला हिंदी शिपायांच्या बाबतीत फार मोठा अर्थ होता. या कायद्याचा साधा अर्थ हा होता की, हिंदी शिपायाला लष्कराबाहेरील जगात स्वतःची विशिष्ट जातपात, धर्म वगैरे गोष्टी असू शकत होत्या. म्हणजेच बाहेर त्याला स्वतःची निश्चित सांस्कृतिक ओळख असू शकत होती. परंतु लष्करात वावरताना त्याला ही ओळख स्वतःची जातपात व धर्म गुंडाळून ठेवावा लागणार होता. कारण लष्करात तो हिंदू नव्हता, मुसलमान नव्हता, वा शीखही नव्हता. लष्करात तो केवळ ब्रिटिश शिपाई होता. आणि ब्रिटिश लष्करी कायदा म्हणजे ब्रिटिश लष्करी नियमांची काटेकोर अंमलबजावणी करणारा शिपाई होय याच अर्थाने मी वर असे म्हटले की, ब्रिटिशांच्या येथील आगमनाबरोबर जे सांस्कृतिक विसंवाद १८५० तल्या हिंदी समाजाला सहन करावे लागत होते त्याचे चटके हिंदी शिपायाना इतर सर्वांपेक्षा मोठ्या प्रमाणावर व अधिक प्रखरतेने सहन करावे लागत होते. कारण स्वत.चे सांस्कृतिक स्वत्व व धार्मिक इमान टिकवून धरण्यासाठी त्याने केलेला प्रत्येक प्रामाणिक प्रयत्न हा त्याच वेळी त्याच्या ब्रिटिश मालकाच्या दृष्टीकोनातून त्याला बेईमान, राजद्रोही ठरवित होता.

हिंदुस्थानात यानंतर काय घडून येणार आहे याची पहिली चिन्हे १८०६ मध्ये मद्रास प्रांतात जे घडले त्यात दिसू शकली असती. हिंदु शिपायानी कपाळावर गंधाचा टिळा लावता कामा नये, त्यानी आपली दाढी विशिष्ट मापातच राखली पाहिजे, डोक्यावर चामड्याच्या वादीचेच पागोटे घातले पाहिजे हे सर्व नियम मद्रास लष्करातल्या शिपायाना लागू करण्याची अनुज्ञा जेव्हा सर जॉर्ज बार्लो या मद्रासच्या गव्हर्नर जनरलने मद्रास लष्करी अधिकाऱ्याला दिली तेव्हा वेलोरच्या शिपायानी मोठे बंड केले. कोणत्याही कारणास्तव हिंदी



अनुक्रमणिका

शिपायाना परदेशात कामगिरीवर पाठविण्यात येणार नाही हे स्वतःचे वचन जेव्हा कंपनीने मोडले तेव्हा बराकपूरच्या सैन्यात बंड झाले. कारण त्या काळी एखाद्या हिंदू मनुष्याने आपला देश सोडून परदेशी जाणे म्हणजे स्वतःची जात गमावण्यासारखे होते.

ब्रिटिश लष्करात या प्रकारचे प्रसंग उत्तरोत्तर वाढतच होते. तथापी अशा प्रकारच्या प्रसगांचा परिणाम होऊन हिंदी शिपाई राष्ट्रीय पुनरुज्जीवनाच्या हेतूने एकत्रित आलेच असते असे खात्रीपूर्वक सांगता येत नाही. त्याना या कारणासाठी एकत्रित आणण्याचे काम ब्राऊन बेस बंदुकांऐवजी अधिक कार्यक्षम अशा एनफिल्ड रायफल्स सैन्यात वापरावयाच्या असा जो निर्णय १८५७ मध्ये ब्रिटिशानी घेतला त्या निर्णयाने केले. कारण या बंदुकांसाठी जी काडतुसे वापरीत त्या काडतुसाना ग्रीज लावित आणि ती पातळ कागदात गुंडाळलेली असत. काडतूस बंदुकीत सरकविण्यापूर्वी हा कागद काढून टाकावा लागे. परंतु त्यासाठी कागदाचे वरचे टोक दातानी तोडावे लागे. या प्रकरणी सैन्यात जेव्हा अशी आवई उठली की, काडतूसाना लावलेले ग्रीज गाईच्या व डुकराच्या चरबीपासून बनविलेले असते तेव्हा हिंदी सैन्यात जो हाहाकार माजला त्याची फक्त कल्पनाच करता येईल. कारण हिंदूंसाठी गाय पवित्र होती आणि मुसलमानांसाठी डुक्कर निषिद्ध होते. हे ग्रीज गाय वा डुकराच्या चरबीपासून बनविण्यात येत नाही; ते वनस्पती व मेणापासून तयार करतात या प्रकारची अश्वासने जरी शिपायाना दिली गेली व लष्करी शिस्तीचा भंग केल्यास ( उदा. वरील प्रकारची काडतुसे वापरण्यास नकार दिल्यास ) शिस्तभंग करणारास कडक शासन करण्यात येईल अशी धमकीही त्याना दिली जात होती (अनेकदा या धमक्यांबरहुकूम शिपायाना शासनसुद्धा दिले जात होते) तरीही हिंदी शिपायातल्या असंतोषाने शीग गाठली.

चरबी लावलेले काडतूस हे हिंदी लोकांविरुद्ध ब्रिटिशानी जी आक्रमक आघाडी उघडली होती त्या आघाडीचे प्रतीक बनले. आपली संस्कृती बुडत चालली असून तिचा अंतकाळ नजिक आला आहे असे जे हिंदी शिपायाना वाटू लागले होते त्या भावनेची काडतूस-प्रसंग ही परमावधी होती. या भयप्रद व धोकासूचक परिस्थितीबाबतची ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्यांची प्रतिक्रिया तितकीच प्रखर विरोधाची व निषेधाची होती. खोट्या अहंगंडाची व स्वतःच्या खोट्या राष्ट्राभिमानाची !

धार्मिक कारणासाठी काडतूसांचे वेष्टन दातानी तोडण्याची आज्ञा पाळणे ज्याना शक्य नव्हते त्या शिपायावर लष्करी कायद्यान्वये तातडतोब कारवाई

करण्यात आली. या प्रसंगापासून इतर शिपायानी धडा घ्यावा म्हणून शिक्षा झालेल्या शिपायांची त्यांच्या सहकाऱ्यांसमोर सार्वजनिक नाचक्की करण्यात आली. इतके दिवस ज्या इमानेइतबारे व शौर्याने या शिपायानी ब्रिटिश लष्कराची सेवा केली होती त्या त्यांच्या गुणांची यत्किंचितसुद्धा कदर ब्रिटिश सेनाधिकाऱ्यानी या प्रसंगी ठेवली नाही. काही तुकड्यातील सर्वचजणानी दाताने वेष्ठने तोडावयास नकार दिला होता. अशा संपूर्ण तुकड्याच सैन्यातून बाद करुन त्यातील शिपायाना घरी बसविण्यात आले. या कडक कारवाईचा परिणाम एवढाच झाला की, आपली वडिलोपार्जित संस्कृती या प्रसंगी आपण टिकवून धरायची की, केवळ पोट जाळीत कसे तरी जगायचे या प्रश्नाची अपरिहार्यता ढळढळीतपणे शिपायाना त्या कारवाईने जाणवून दिली. तसेच त्याच कारवाईमुळे हाच अपरिहार्य निर्णय खेडोपाडी पोचवावयास शिपायाना उद्युक्त केले.

ब्रिटिश लष्करातून काढून टाकलेल्या शिपायांपैकी बहुतेक शिपाई आग्रा आणि औध भागातून आलेले होते. सैन्यातून त्याना कमी केले जाताच ते परत आपल्या गावी गेले. बेकार झालेले असे शेकडो भाडोत्री शिपाई आपापल्या गावी या काळात परतले होते. त्यानी गावी परतताच स्वतःचे दैन्य व निराशा आपल्या जातभाईसमोर, धर्मबांधवांसमोर आणि गावातल्या परपरागत थोरांसमोर व्यक्त केली. आपल्या गाववाल्यांच्या दुःखात आणि निराशेत स्वतःच्या दुःखाची व निराशेची भर त्यानी घातली.

चरबी लावलेल्या काडतूसाचा प्रसंग घडून गेल्यानंतर येथील लोकांच्या हृदयाचा थरकापच उडून गेला. त्या प्रसंगापासून बहुजनसमाजाला असे वाटू लागले की, आता आपला धर्म व संस्कृती शिल्लक राहात नाही. आपले जे जे म्हणून असे आजवर आपण म्हणत आलो ते ते सर्व आता थोड्याच दिवसात रसातळाला जाणार या विचाराने सर्व हिंदुस्थानचा कबजा घेतला. हिंदुस्थानभर एक प्रकारचे भीतीचे वातावरण पसरले. कानपूरचे नानासाहेब, दिल्लीच्या दुसऱ्या बहादुरशहाचे पुतणे, झांशीची राणी, लखनौच्या वजीद अली शहाची बेगम ( जिच्या नवऱ्याला ब्रिटिशानी हद्दपार केले होते पण जी स्वतः लखनौमध्ये राहात होती ) पुन्हा एकदा जुन्या मुसलमानी रिसायतीचे पुनरुज्जीवन घडवून आणावे असे मनसुबे रचणारा वहाबी नावाचा मुसलमानी पंथ या सर्व मंडळीना या तापलेल्या वातावरणाचा फायदा घेऊन त्या त्या ठिकाणी कट करून ब्रिटिशांविरुद्ध संघटित उठाव करता आला. आधीच देशभरचे वातावरण तप्त आणि स्फोटक होते. त्यात या मंडळीनी गुप्तपणे कट करून बंडाळ्या घडवून आणल्या.



अनुक्रमणिका



या बंडाळयांमुळे या वातावरणाला स्वतःचे खास नाव मिळाले, ओळख प्राप्त झाली. कारण आता त्या बंडाळचा हा ब्रिटिशाना या देशातून बाहेर घालविण्याचा कार्यक्रम ठरला. तथापि काही झाले तरी एक गोष्ट आपण विसरता कामा नये असंतुष्ट राजेरजवाड्यांकडून ब्रिटिशांविरुद्ध संघटित उठाव घडून येण्यापूर्वी येथील लोकमत ब्रिटिशांच्या विरुद्ध खवळलेलेच होते. या प्रक्षुब्ध वातावरणाचा फायदा मागाहून राजेरजवाड्यानी घेतला. परंतु ज्यानी हा फायदा घेतला त्यानी स्वतः काही ते वातावरण तसे तयार केले नव्हते. हे ब्रिटिशविरोधी वातावरण त्यानी निर्माण केले नव्हते वा ते वातावरण निर्माण व्हावे म्हणून लोकाना तशा प्रकारची चालनाही त्यानी दिली नव्हती. तेव्हा त्या विशिष्ट ब्रिटिशविरोधी वातावरणाचा त्यानी फायदा घेतला एवढ्यासाठी त्या वातावरणाचे कर्तेसुद्धा तेच होते असे म्हणणे केव्हाही बरोबर ठरणार नाही. एखाद्या तयार वातावरणाचा स्वत.च्या फायद्यासाठी उपयोग करून घेणे वेगळे आणि स्वतःला फायदेशीर अशा प्रकारे बाह्य वातावरण मुळातच तयार करणे वेगळे.

१८५७ च्या घटना हा "गुप्त कटाचा भाग" होता किंवा ते "स्वातंत्र्ययुद्ध" होते असे प्रतिपादन करणारे लोक विशिष्ट फायदेशीर वातावरणाचा फायदा घेणारानाच ते वातावरण निर्माण करणारेसुद्धा मानीत आहेत. माझ्या मते १८५७ चा उठाव ही एक पुनरुज्जीवनवादी चळवळ असल्याने त्या चळवळीत येथील परक्या राज्यकर्त्यांच्या विरोधी वातावरण होते. या विरोधी वातावरणाचा फायदा काही संघटित शक्तिनी घेतला, आणि सशस्त्र उठाव घडवून आणला. एकूण साधकबाधक पुरावा पाहिल्यास "अठराशे सत्तावनची घटना हा गुप्त कट" होता किंवा ते "स्वातंत्र्यसमर" होते या वर उल्लेखिलेल्या दोन मतांपेक्षा माझेच मत–की ती एक पुनरुज्जीवनवादी चळवळ होती व देशात पसरलेल्या पुनरुज्जीवनवादी वातावरणाचा फायदा घेऊन येथील काही संघटीत शक्तीनी ब्रिटिशांच्या विरुद्ध सशस्त्र उठाव घडवून आणला –अधिक सयुक्तिक असण्याची शक्यता आहे. यासंबंधी अधिक चर्चा पुढे येईलच.

५

हे तर अगदी उघड आहे की, आपली संपूर्ण वडिलोपार्जित संस्कृती एका फार मोठ्या आवर्तात सापडत आहे ही भावना हिंदी जनतेच्या मनात उत्तरोत्तर वाढत चालली होती. विशेषतः गंगा नदीच्या काठचा जो भाग पूर्वी मोंगल साम्राज्यात मोडत असे त्या भागात तर ही भावना फारच प्रखर बनत होती. त्यामुळे येथील लोकांच्या भावना अत्यंत ताणल्या गेल्या होत्या. काही तरी



अनुक्रमणिका

उत्पात लवकरच घडणार असे त्याना वाटू लागले होते आणि त्या उत्पाताची ते सर्व वाट पाहू लागले होते. एकीकडे उत्पात घडणार असे जनसमुदायाला वाटत होते तर दुसरीकडे असेही वाटत होते की, ही भयानक घटना घडून गेल्यानंतर पुन्हा एकदा आपल्या देशात नवे सत्ययुग अवतरणार आहे काही तर खूप खूप वाईट घडणार व ते घडून गेल्या–नंतर पुन्हा एकदा काही तरी खूप खूप चांगले, मंगल असे घडणार या प्रकारच्या अस्पष्ट कल्पनानी लष्कर व हिंदी ग्रामीण प्रदेश निव्वळ अस्वस्थ बनून राहिला होता. मात्र ब्रिटिशांच्या सभोवताली जे काही घडत होते त्याची अंधुकशी का होईना पण निश्चित कल्पना येथील ब्रिटिश लष्करी अधिकाऱ्यानासुद्धा आलेली होती. कारण १३ एप्रिल १८५७ रोजी सेप्टेमिअस हार्डिंग बेचर याने कॅप्टन इ एम्. मार्टिनो यास लिहीलेल्या एका विस्मयकारक पत्रावरुन ' असे दिसते की, " हिंदी सैनिकाना ब्रिटिश गणवेश दिला, आमच्या शस्त्रांसारखी शस्त्रे त्यांच्या हातात दिली नि आम्ही करतो तशी कवाईत त्यांच्या कडून आम्ही करुन घेतली म्हणजे थोड्या प्रमाणात का होईना पण त्यांचे विचार व त्यांच्या भावना आम्हां युरोपियानांसारख्या बनतात असे मानणे हे चूक आहे. कवायतीच्या वेळी फक्त दोन तास काय ते मी त्याना पाहातो. ठरलेल्या २२ तासात ते काय करतात हे मला कोठे माहित असते?

" ते बराकीत असताना काय काय गोष्टी करतात, कसकसली संगनमते करतात हे मला कोठे माहित होते?

" संपूर्ण हिंदी लष्करात एक विलक्षण अस्वस्थता पसरत चालल्याचे मला दिसत आहे. मात्र या सगळ्या प्रकरणाची अखेर काय होईल हे मी सांगू शकत नाही. वादळ अगदी नजिक आले आहे हे माझ्या दृष्टीला दिसू शकते...... देशभर, सगळीकडे नजिक आणि अतिदूरच्या प्रदेशात लष्कर काही तरी घडण्याची चातकासारखी वाट पाहात आहे आणि लष्कराची मनस्थिती पिसाटाची बनली आहे कोठल्या तरी अज्ञात प्रेरक शक्तीने सगळ्या सैन्यामध्ये एक चेतना प्रज्वलित केली आहे.

" ते पुढे काय करणार होते याबद्दल त्यांची त्याना स्पष्ट कल्पना होती; आणि त्यांचा धर्म नि त्यांच्या श्रद्धा यांच्यावर जे आक्रमण होत आहे त्या आक्रमणाला विरोध करण्याची एक बाब सोडली तर इतर कसल्या योजना त्यांच्यापाशी

---

( टिप– हे पत्र गुल्ड म्हणतात त्या प्रमाणे बेचरने मार्टिनो यास लिहीलेले नसून ते मार्टिनोने बेचरला लिहीले आहे- अनुवादक);

असतील असे मला वाटत नाही . . . . .मात्र कसल्याही कारणाने का होईना पण एका सैनिकी तळावर जर आग पेटली तर तिचा वणवा साऱ्या देशभर पसरणार आहे असे मला वाटते."

(११-जे. बी. पामर-" द म्युटिनी आउटब्रेक अॅट मीरत इन १८५७ " केंब्रिज युनिव्हर्सिटी प्रेस, १९५६-पृ. ३२. ३३ )

१८५७ च्या उठावाच्या आधी हिंदुस्थानात जे घडत होते त्याचे बेचरने केलेले हे वर्णन हे वर्णन. वाचताना आपल्यासुद्दा हे लक्षात येऊ शकेल की, येथील परिस्थितीची म्हणून बेचरने दिलेली लक्षणे ही पुनरुज्जीवनवादी चळवळींच्या प्रारंभी जी लक्षणं असतात त्याचे वर्णन होते. म्हणजे निरिक्षण बरोबर होते. परंतु या निरिक्षणाचा अर्थ लावण्यासाठी आवश्यक त्या तात्विक संकल्पना व परिभाषा त्याच्यापाशी नव्हती. त्यामुळे हिंदुस्थानात त्यावेळी जे घडत होते ती एक पुनरुज्जीवनाची चळवळ आहे हे त्याला उमगत नव्हते हिंदुस्थानातील तत्कालिन परिस्थितीचे बेचरने केलेले वर्णन पाहाता अशा चळवळीतील महत्वाचे घटक कोठले आणि अशा चळवळीत काय काय असते हे त्याला जाणवले होते असे म्हणता येते. एवढेच नव्हे तर त्याला जे सांगावेसे वाटत होते ते सांगता यावे म्हणून तो शब्दासाठी धडपडत असल्याचेही आपणास जाणवते.

बेचरने तत्कालीन परिस्थितीचे वर्णन करताना आपल्या पत्रात " विलक्षण क्षुब्धता " ' वादळाची पूर्वचिन्हे " " विलक्षण असे काही तरी लवकरच घडून येणार आहे अशी दबलेली भावना. " सर्व हिंदी सैन्याच्या अंगात संचारलेली सामुदायिक चेतना," " त्यांचा धर्मसंप्रदाय आणि श्रद्धा यांच्यावर आक्रमण करणाऱ्या परिस्थितीला केला जाणारा प्रतिकार " हे किंवा या अर्थाचे शब्दप्रयोग आपल्या नजरेस पडतात. बेचरची भीती खरी ठरविणारा प्रसंग अगदी दोनच महिन्यानी मीरत येथे घडणार होता. तथापी भावी सत्ययुगाची वाट पाहणाऱ्या लोकांची मानसिक अवस्था सूचित करणारी प्रतिकात्मक चिन्हे येथे केव्हापासूनच दिसू लागली होती.

या प्रतीक चिन्हांपैकी सर्वात अधिक नाटयपूर्ण प्रतीकचिन्ह होते ते ' फिरत्या चपात्यांच्या घटनेचे जानेवारी १८५७ पासून कमळाच्या बिया घातलेल्या (कमळाचे बी हे हिंदुधर्मीय पुनरुज्जीवनाचे प्रतीक मानण्यात येते.) एकदोन चपात्या गंगेच्या खोऱ्यातल्या गांवप्रमुखाकडे कोठल्यातरी अज्ञात ठिकाणाहून येऊ लागल्या होत्या. या चपात्यांबरोबरच त्या गांवप्रमुखाला आदेशसुद्धा असे की, त्याने अशाच प्रकारच्या चपात्या पुढील गावप्रमुखाकडे

पाठवून देऊन चपात्यांची ही साखळी अभंग ठेवावी. या चपात्या म्हणजे संदेश होता. फिरंग्यांच्या जाचातून लवकरच आपली आता सुटका होणार असून त्याच्याचबरोबर आमच्या सनातन संस्कृतीचे पुनरुज्जीवनसुद्धा त्याच वेळी घडून येणार हा जो संदेश फिरत्या चपात्या देत होत्या तो हां हां म्हणता खेडोपाडी पोहोचला.

फिरत्या चपात्यांचे प्रतिक होकारात्मक होते असे मानले तर दुसरे एक नकारात्मक प्रतीकसुद्धा येथेच दाखविता येईल. उदा. फिरत्या चपात्यांच्या वार्तेप्रमाणेच बाटग्या आटयाची वार्तासुद्धा याच काळात हिंदुस्थानभर पसरली होती. शिपायाना गाईची व डुकराची चरबी लावलेली काडतूसे कंपनी सरकार देते या अफवेत आणि बाटग्या आटयाच्या अफवेत कमालीचे तार्किक साम्य होते. या दोन अफवात फरक एवढाच होता की, बाटग्या काडतूसांची अफवा शिपायात पसरली होती तर बाटग्या आटयाची अफवा सामान्य नागरी लोकात पसरली होती. बाटग्या काडतूसांची अफवा काय ते आपण मागे पाहिले. बाटग्या काडतूसांच्या अफवेप्रमाणेच दुसरी अशी एक अफवा देशात पसरली होती की, फिरंगी बाटगा आटा गावात विकत आहेत. डुकराच्या मांसाचा आणि गाईच्या हाडांचा भुगा मिसळलेला आटा विलायतेतून आणून येथे विकला जात असून असे करण्याचा हेतू मुसलमान आणि हिंदू जमातीना फिरंग्याना भ्रष्ट व नष्ट करायचे आहे. ही अफवा वाळलेल्या गवतावर आगीची ठिणगी पडावी आणि चोहो बाजूस भयंकर वणवा पसरावा तशी पसरली. बाटग्या आटयाच्या अफवेमुळे लोकात अशी भीती पसरली की, भ्रष्ट आटा खाऊन एकदा का आपली जात बुडाली की, ख्रिस्ती मिशनरी आपणा सर्वांना ख्रिस्ती धर्माची दिक्षा देणार आहेत. आणि एकदा का आपण ख्रिस्ती बनलो की, आपली सगळी संस्कृती हां हां म्हणता लयास जाईल.

मागे पाहिल्याप्रमाणे १० मे १८५७ रोजी मीरत येथे या प्रकरणाचा अखेरीस स्फोट झाला व त्या स्फोटाची पहिली ठिणगी कर्नल कारमायकेल स्मिथ या कडक शिस्तीच्या लष्करी अधिकाऱ्याने पेटवली होती. आपल्या तळावरच्या सगळया हिंदी शिपायाना चांगला धडा शिकवावा या हेतूने प्रेरित होऊन स्मिथ साहेबाने तिसऱ्या हिंदी घोडदळातल्या निरनिराळया पथकातून ९० शिपाई निवडून काढले; त्याना कवायतीच्या मैदानावर कवायतीसाठी उभे केले व नवी काडतुसे बंदुकीत भरण्यास त्याना फर्मांविले. यावर नव्वदापैकी पंच्याऐंशी शिपायानी काडतुसे भरण्याचे नाकारले तेव्हा त्या सर्वांना



अनुक्रमणिका

अटक करण्यात आली. आणि ताबडतोब त्याना लष्करी न्यायालयापुढे उभे करण्यात आले तेथे त्यातील प्रत्येकाला दहा दहा वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा दिली गेली. शिक्षेनंतर प्रत्येकाच्या हातात साखळदंड घालून त्याना इतर सैनिकांसमोरून मिरवीत नेऊन लष्करी कैदखान्यात बंद करण्यात आले.

त्याच दिवशी संध्याकाळी म्हणजे १० मे च्या संध्याकाळी पाच वाजण्याच्या सुमारास तोफखान्यावरच्या व बंदूकवाल्या शिपायानी शस्त्रागारातून आपापली शस्त्रास्त्रे हस्तगत केली असून आपल्या सहकारी सैनिकाना कैदखान्यातून सोडविण्यासाठी कैदखान्याकडे आपला मोर्चा वळविला आहे असे मोठ्याने ओरडत एक स्वयंपाकी पोरगा बराकीबराकीतून धावत गेला. शांतता व सुव्यवस्था कोसळल्याचे दिसून येताच गावातल्या सर्वसामान्य नागरिकानीसुद्धा दंग्याधोप्याला सुरवात केली. अशा प्रकारे गोंधळ आणि हाणामारीच्या गडबडीत काही तास उलटल्यावर मीरतचे शिपाई "कंपनीचे राज्य खलास झाले" अशा घोषणा देत बादशहा बहादुरशहाच्या तर्फे लढण्यासाठी दिल्लीच्या मार्गाला लागले. नंतरच्या एक महिन्याच्या काळात बंगाल, पंजाब नि दक्षिणेचे पठार या भागात एक देखिल युरोपिय मनुष्य शिल्लक राहिला नाही अपवाद केवळ लखनौच्या स्वतःच्या रहात्या ठिकाणी वेढ्यात १४० दिवस अडकून पडलेल्या राजनिष्ट शिपायांचा आणि मोजक्या युरोपियनांचा!

इंग्रजांकडून लढाईचे शिक्षण घेतलेल्या हिंदी शिपायानी आपल्या इंग्रज मालकाला येथे सोडचिठी दिली. आणि आपले सगळे इंग्रजप्रशिक्षित लष्करी कौशल्य अगदी स्वयंस्फूर्तीने येथल्या समाजधुरीणांच्या पायी वाहिले. हेतू हा की, आपण देऊ केलेल्या लष्करी कौशल्याच्या मदतीच्या जोरावर त्यानी परत एकदा या देशात सनातन राजकीय, धार्मिक व सांस्कृतिक घडी प्रस्थापित करावी.

पण या देशात पुन्हा एकदा जी प्राचीन राजकीय, धार्मिक व सांस्कृतिक घडी हे शिपाई आणू पहात होते तिचे स्वरूप तरी काय होते? या नव्या घडीची कल्पना त्यानी कोठून बरे घेतली होती? ही कल्पना त्यानी गेल्या जमान्यातल्या हिंदी राजवटीसंबंधीच्या ऐकीव माहितीतून घेतली होती. उद्या येऊ घातलेल्या किंवा ते जी नवी घडी आणणार होते त्या नव्या घडीचे चित्र त्यानी मागल्या हिंदी सरकारांच्या ऐकल्या-पाहिल्या कथांवर बेतले होते. प्रत्यक्षात विचार केल्यास असे दिसते की, हे सर्व शिपाई स्वतःच्या कृतीमधून हिंदी राजेरजवाड्यांपासून ते थेट हिंदी शेतकऱ्यांपर्यंत अखिल हिंदी जनतेचीच मूक इच्छा बोलून दाखवित होते. ज्या भौतिक जगामध्ये फार मोठे

परस्पर-विरोध नाहीत; जे जग सर्वदृष्टया सुखी व स्वास्थ्यपूर्ण आहे अशा जगाची ओढ सगळया हिंदी जनतेला लागली होती. आणि त्याच इच्छेचे पडसाद शिपायांच्या कृत्यात उमटले होते. पुनरुज्जीवनवादी चळवळीचा हा एक प्रचंड लोंढा शिपायानी आज मोकळा केला होता. आणि साऱ्या हिंदुस्थान देशातून फार मोठया प्रमाणावर त्याला उत्स्फूर्त प्रतिसाद मिळत गेला.

या प्रकारच्या पुनरुज्जीवनवादी चळवळींचो काही विशेष लक्षणे आहेत. सांस्कृतिकदृष्टया अगदी प्राथमिक स्तरावर असणाऱ्या म्हणजेच आदिम समाजांमध्ये जेव्हा या जातीच्या चळवळी घडून येतात तेव्हा त्या चळवळीना चालना देण्यासाठी एखादा प्रेषित तेथे पुढे सरसावलेला असतो. हा प्रेषित तेथील लोकांना स्फूर्ती देतो व त्यांच्याकडून ती चळवळ घडवून आणतो. कधीकधी एका प्रेषिताऐवजी तेथे प्रेषितांचो एक मोठी साखळीसुद्धा उदयाला येते. परंतु हिंदुस्थानात असे काहीसुद्धा घडले नव्हते. वैयक्तिक प्रेषितावाचूनच ती चळवळ घडून आली होती. किंवा असेही म्हणता येईल की, एकटयादुकटया प्रेषिताऐवजी तो शिपायांचा सगळा समुदायच खुद्द एक सामुदायिक प्रेषित बनला होता. प्रेषित बनलेला हा शिपायांचा लोंढा त्यांच्या देशातील सनातन सामाजिक धुरंधरांकडे म्हणजे पूर्वीच्या राजेरजवाडयांकडे धोशा लावित होता की, तुम्ही आता तुमची राजकारणधुरंधरांची परंपरागत भूमिका स्वीकारून आमच्या लढयाचे पुढारीपण स्वीकारण्यासाठी पुढे व्हा. आम्हाला मार्ग दाखवा. आम्ही तुमच्या मार्गदर्शनाची वाट पहात आहोत.

अशा प्रकारच्या सामाजिक चळवळीतून सर्वसाधारणपणे घडते ते असे. समाजातील धुरीण मंडळी सामाजिक पुनरुत्थानासाठी पुढे होऊन सामान्य जनतेला चेतवतात. आणि ती सामान्य जनता त्या धुरीणांच्या पुढाकाराखाली सामाजिक पुनरुत्थानाचे कार्य घडवून आणतात. समाजधुरीणानी आधी चालना द्यावयाची व लोकसमुदायाने त्यांच्या मार्गदर्शनाखाली चळवळी करायच्या हे दृश्य आपल्या इतके काही अंगवळणी पडले आहे की, १८५७ च्या उठावाच्या वेळी या देशात जे काही घडत होते त्याचा खरा अर्थच कोणाच्या ध्यानात येत नव्हता. कारण सैन्यातील शिपाई लोकानी सामाजिक पुनरुत्थनाच्या कार्यात पहिला भाग घ्यावा, बहुजन समाजाने त्याना नंतर पाठिंबा द्यावा व त्या सर्वानी मिळून मार्गदर्शन व नेतृत्वासाठी पारंपरिक समाज धुरंधरांकडे वळावे हे जे दृश्य त्या काळी येथे दिसून आले त्याचे नेमके मर्म अभ्यासकाना कळलेच नाही. परिणामतः १८५७ च्या घटनेचे यथार्थ स्वरूपसुद्धा त्याना कधी कळले नाही.



अनुक्रमणिका

याच मुद्याचा अधिक खोलात जाऊन आपण परामर्ष घेऊ. १८५७ च्या उठावा संबंधी मी जे प्रतिपादन करीत आहे त्यातून मला हे सांगायचे आहे की, या उठावाकडे वरवर पाहाता जरी असे दिसत असले की, हा उठाव बंगाली लष्करातल्या पोटार्थी शिपायानी केला होता; या शिपायानी आपल्या अधिकाऱ्यांविरुद्ध ठिकठिकाणी कित्येक स्थानिक स्वरुपाचे उठाव केले होते व त्यातून तो प्रकार घडला होता; तरी खरे पाहाता ते तसे नव्हते. कोणी जेव्हा म्हणतात की, या सगळया घटना म्हणजे स्थानिक स्वरुपाचे उठाव होते तेव्हा त्याना असे म्हणायचे असते की, या घटनांचे स्वरूप फुटकळ होते. त्या घटनांच्या मागे कोणत्याही प्रकारची सुसंगत योजना नव्हती. तेव्हा त्यांचे म्हणणे बरोबर नसते. उठावाच्या ह्या घटना असंबद्ध वा फुटकळ नव्हत्या त्यांच्या मागे काही एक समान सूत्र होते. तार्किकता होती. आणि हे सुत्र व तार्किकता असल्यानेच त्याना उठाव न म्हणता सामाजिक प्रक्रिया असे म्हणावयास हवे. शिपायानी ब्रिटिशांविरुद्ध केलेले हे उठाव म्हणजे सामुदायिक चळवळ होती ती साधी बंडे नव्हती.

हे खरे की, लष्करी शिपायांचे हे उठाव भिन्नभिन्न ठिकाणी घडले होते. मात्र याचा अर्थ त्यांचा परस्परांशी संबंध नव्हता असे नाही. कारण भिन्नभिन्न ठिकाणच्या या घडामोडीत एक अंगभूत साम्य होते. या उठावातील अनेक घटक सारखे होते या उठावाची एकूण सर्वसाधारण लक्षणेसुद्धा एकसारखी होती.

हे सारखेपण त्या उठावात भाग घेणाऱ्या राजेरजवाडयांमुळे आले नव्हते. किंवा वहाबी पंथीय त्यात सामील होते. म्हणूनसुद्धा आले नव्हते. किंवहुना कट करून हे उठाव घडवून आणण्यात आले होते म्हणूनही ते सारखे झाले होते असे नाही. या सर्व उठावांच्या मागील कल्पक बुद्धी व आखणी समान म्हणजे राजेरजवाडे व वहाबीपंथीय होती म्हणून ते उठाव सारखे वाटत होते असेही नाही. या उठावांच्या सारखेपणाचे मूळ अगदीच वेगळया गोष्टीत होते.

वर आपण उठावाना कारणीभूत झालेल्या परिस्थितीचा आढावा घेतला. त्यात आपणास असे दिसून आले की ,शिपाई आणि सामान्य जनता दोघेही समान विचारसरणीने प्रेरीत झाली होती. ब्रिटिश आणि त्यांची जी विचारसरणी ते येथे दृढमूल करू पहात होते ती विचारसरणी या दोघांच्या प्रतिकारासाठी शिपाई व जनता सज्ज झाली होती. तसेच ब्रिटिशानी या भूमीवरून आपला पाय काढला की, एक नवे जग येथे अवतरणार होते व ते आणण्यासाठीसुद्धा शिपाई व जनता कटिबद्ध झाली होती. म्हणजे नकारात्मक आणि होकारात्मक अशा दुहेरी उद्देशाने शिपाई व जनता एकत्र आले होते.



अनुक्रमणिका

एकीकडे त्याना त्यांच्या प्रिय संस्कृतीवरचे आक्रमण परतवून लावायचे होते. तर दुसरीकडे हे आक्रमण परतवून लावताच नव्या जीवनाची प्राणप्रतिष्ठा करायची होती. शिपाई व जनता ज्या नकारात्मक आणि होकारात्मक कारणानी एकत्रित आले होते त्या नकारात्मक आणि होकारात्मक कारणात सारखेपण होते ज्या सांस्कृतिक संकटामुळे शिपाई बंडास प्रवृत्त झाले होते तेच सांस्कृतिक संकट येथील जनतेलासुद्धा भेडसावीत होते. तसेच ज्या कल्पनारम्य भावी सुखी समाजाच्या पुनर्प्रस्थापनेच्या आशेने ते शिपाई बंडास तयार झाले होते तीच आशा जनतेलासुद्धा खुणावत होती. सारांश, त्यांचा ग्रास करू पहाणारे संकट व त्या संकटावरचा त्याना सुचलेला उतारा या दोहोंच्या बाबतीत शिपाई व जनता या दोघात एकमत झाले असल्याने त्याचेच प्रतिबिंब उठावात उमटत होते आणि ते उठाव ही एक सलग चळवळ वाटत होती. कट नव्हे तर त्यातील उद्दिष्ट एक असल्याने ते उठाव सुसंगत वाटतात. व जरी ते उठाव वेगवेगळया ठिकाणी घडले होते तरी सुसूत्र वाटतात. शिपाई जसे स्वतः होऊन बंडात सामील झाले होते तशीच जनता-सुद्धा स्वतः होऊन बंडात सामील झाली होती आणि दोघेही एकाच व समान कारणासाठीच बंडात सामील झाली होती म्हणूनच शिपाई व जनतेचा तो उठाव ही सामुदायिक चळवळ होती असे आपण म्हणत आहोत.

येथील बहुसंख्य जनता आणि शिपाई यांचे त्यांच्यावर येऊ घातलेल्या सांस्कृतिक संकटाबद्दल आणि त्या संकटापासून त्याना वाचवू शकणाऱ्या समाजाबद्दलच्या कल्पनाचित्राबद्दल एकमत होते. आणि या एकमतामुळे ते तशा प्रकारे ब्रिटिशांविरुद्ध सशस्त्र उठाव करून उठले होते. लोकसमुदाय एकदा का अशा प्रकारच्या समान स्वप्नरंजनात अडकला की, मग त्याला त्या स्वप्नावाचून दुसरे काहीही नकोसे वाटते. त्या स्वप्नाचा अंमल त्याच्यावर असेपर्यंत ते स्वप्नच त्याच्यादृष्टीने सत्य असते. त्या स्वप्नाखाली ती मनुष्ये बेभान होतात. वाटेल ते कृत्य करू शकतात. नॉर्मन कोहन नावाच्या अभ्यासकाने मध्ययुगीन युरोपमधल्या अशा प्रकारच्या कित्येक सामुदायिक उन्मादाच्या चळवळींचा अभ्यास करून काही निष्कर्ष काढले आहेत. हिंदुस्थानात १८५७ मध्ये जे काही घडले होते त्यालादेखील हे निष्कर्ष लावता येतील. एखाद्या तीव्र स्वप्नरंजनाच्या आहारी गेलेल्या लोकसमुदायाचे वर्णन करताना नॉर्मन कोहन लिहितात की, " ते सगळे अगणित लोक एका सामाईक स्वप्नरंजनाच्या आहारी गेले होते. आता खरे पाहता ते स्वप्नरंजन म्हणजे जरी एक साक्षात भ्रम होता तरी ते स्वप्न नसून ते साक्षात सत्य

आहे या त्यांच्या दृढ विश्वासामुळे त्याना मानसिक दिलासा मिळत होता. आणि त्याच्याचमुळे त्या विशिष्ट स्वप्नरंजनात्मक अवस्थेतले जगणे तेवढेच खरोखरीचे जगणे असे त्याना भासत होते. एवढेच नव्हे तर केवळ त्याच कारणाने त्या स्वप्नरंजनाच्या वेदीवर स्वत चा देह ठेवण्याची त्यांची तयारी होती. त्यामुळे झाले काय की, लोकांचे जमावच्या जमाव आवेशयुक्त उन्मादात ते समाईक स्वप्नरंजन जगत राहिले. . . .[१२]

शिपायांच्या उठावाच्या जवळपास प्रत्येक प्रकरणामध्ये घडलेल्या घटनांचा क्रम पुढील प्रमाणे आहे.- (१) लष्करी तळाचा कबजा घेण्यात येणे. युरोपिय अधिकारी वर्ग, त्यांचे मदतनीस व कुटुंबीय यांची एकतर कत्तल केली जाणे किंवा तोवर ब्रिटिशांच्या अंमला खाली असलेल्या प्रदेशाकडे त्याना जाऊ देणे. (२) पुढील काही दिवस लुटालूट, दंगधोपे याना ऊत येणे. या काळात शिपाई व स्थानिक नागरिक मिळून गावातली दुकाने लुटित. वा गावाबाहेर हाकलून लावलेल्या युरोपिय लोकांची मालमत्ता लुटीत. याच वेळी एडवर्डस् म्हणतात त्याप्रमाणे ( जो शत्रू आपल्या जीवावर उठला त्याची नावनिशाणी-सुद्धा येथे उरू द्यायची नाही या प्रकारच्या लुटिट अभिनिवेशाने) ते युरोपिय संस्कृतिच्या प्रतीकचिन्हांवर तुटून पडत. त्या चिन्हांची मोडतोड करीत. (३) नंतर तेच शिपाई स्थानिक सत्ताधाऱ्यांच्या राजवाड्याकडे जात व त्याला स्वतःचे पुढारीपण करावयास भाग पाडीत. ज्या ज्या ठिकाणी हे सत्ताधारी बंडाचे नेतृत्व करावयास नाही म्हणत त्या त्या ठिकाणी शिपायानी त्याना प्राणदंडाची भीती दाखविली होती. व अशा तऱ्हेने मारुनमुटकून त्याना स्वतःचे पुढारी बनावयास भाग पाडले होते

एवंच उठाववाल्या शिपायानी व जनतेने हिंदी सनातन संस्कृतीचे पुनरुज्जीवन व रक्षण करू, या शपथेला बांधलेले शासन स्थापन करावयास जुन्या राजेरजवाड्याना भाग पाडले.

मीरत, दिल्ली, लखनौ, कानपूर आणि झांशी येथील बंडखोरानी नेमकी वर म्हटली ती पद्धत अवलंबिली होती; आणि इतर ठिकाणी घडून आलेल्या उठावात देखिल हीच पद्धत अनुसरल्याचे दिसून यते. मीरतच्या सैनिकानी आपला पहिला संताप स्थानिक लष्करी तळावर काढला व नंतर ते दिल्लीकडे रवाना झाले आणि तेथील आपल्या सैनिकी भाईबंदाना मिळाले. मग सर्व मिळून

---

१२ नॉर्मन कोहन, 'द परसुट ऑफ द मिलेनियम' (न्यू यॉर्क हार्पर टॉर्चबुक्स, १९६१) पृ. ७४

आपला मोर्चा त्यानी लाल किल्ल्याकडे वळविला. ते बादशहाकडे गेले व बादशहाने आपली मोंगल बादशाही पुन्हा स्थापन करावी अशी मनधरणी ते त्याची करू लागले. बादशहाचे वय झालेले होते. तो आंधळा होता व त्याला ब्रिटिशांच्या विरुद्ध जाण्याची इच्छा नव्हती. तेव्हा तीच कारणे पुढे करून बंडवाल्यांची मागणी त्याने नाकारली. आपल्या मागणीला बादशहा कबूल होत नाही हे पाहाताच बंडवाले बादशहावर संतापले त्यानी त्याला धमकी दिली की, तू जर आमच्या म्हणण्याप्रमाणे वागला नाहीस तर आम्ही तुला व तुझ्या दरबाऱ्यांस ठार मारू ही धमकी मिळाल्यावर कोठे बादशहा त्यांच्या सूचनेप्रमाणे वागावयास तयार झाला व त्याने दिल्लीचा लोकव्यवहार चालवू शकेले असे कामचलाऊ प्रशासन उभारण्याचा प्रामाणिक प्रयत्न केला.

११ मे १८५७ च्या रात्री ११ वाजता २१ तोफा डागून दिल्लीच्या गादीवर बाबराचा वंशज पुन्हा आरूढ झाल्याचे वर्तमान घोषित करण्यात आले. तोवर सर्व युरोपियनाना व बाटलेल्या खिस्त्याना एकतर जीवे मारण्यात आले होते किंवा दिल्ली शहराच्या बाहेर हाकलून देण्यात आले होते. बादशहा आणि त्याचे सल्लागार हे प्रत्यक्ष राज्यकारभार करण्याच्या दृष्टीने कुचकामी होते. या बाबतीत त्यांचे ज्ञान शून्य असल्याने न्यायदान, लष्करी व्यवस्था व जमाबंदी इत्यादी बाबतीत त्यानी ब्रिटिशांचीच व्यवस्था पुढेही चालू ठेवली परंतु सर्वत्र जवळ जवळ गोंधळ आणि अव्यवस्थेचीच परिस्थिती निर्माण झालेली असल्याने प्रशासनाची गाडी काही रुळावर येऊ शकली नाही. परिणामतः कुठल्या तक्रारीत कोठला न्याय द्यावा, अन्यायाचे परिमार्जन करण्यासाठी काय करावे, असे कारभारविषयक क्षुल्लक प्रश्न देखिल बादशहाकडे घेऊन जावे लागत.

बरेली ठाण्याच्या बंडखोरांचा प्रमुख बख्तखान हा इसम होता. राजकीयदृष्ट्या बख्तखान मोठा चाणाक्ष व कर्तबगार होता. बरेलीत उठाव करून बरेलीच्या फलटणी दिल्लीत आल्या दिल्लीत बख्तखानाने बादशहाला कारभारात खूप मदत केली दिल्लीवरची वृद्ध बादशहाची पक्कड घट्ट व स्थिर करण्यात त्याचा बराच हात होता. अनेक वेगवेगळ्या ठिकाणांहून बंडखोर शिपाई दिल्ली येथे जमा झाले होते त्यांच्या वृत्ती कमालीच्या स्फोटक बनल्या होत्या. बादशहाकडे त्यांची फक्त एक मागणी होती. आणि ती ही की, देशाच्या पुनरुज्जीवनाचे त्यांचे मनोरथ बादशहाने पूर्ण करावेत. बख्तखानाने या नाना प्रकारच्या व नाना स्वभावाच्या अस्थिर घटकाना काबूत ठेवण्याचे महत्वाचे कार्य मुख्यतः पार पाडले होते नाना स्वभावाच्या या शिपायाना हाताळण्यासाठी त्याने स्वतःची अशी वेगळी धाटणी तयार केला होती. हिंदू व मुसलमान

या दोन्ही मंडळींना सांभाळून घेण्याचे तो पाही. हिंदूना गाय पवित्र तेव्हा हिंदूच्या धार्मिक भावना सांभाळल्या जाव्यात यासाठी इदच्या सणातदेखिल गाईचा वध करण्यावर त्याने बंदी घातली होती. बंदी मोडणारास मृत्यूदंड होता. या प्रकारचा सरकारी फतवाच त्याने काढला होता. या विशिष्ट बाबतीत मुसलमानांना धडा घालून देण्यासाठी खुद्द बादशहाने देखिल गाईऐवजी बोकड बळी देऊन स्वतःची ईद साजरी केली. मे ११ ते सप्टेंबर ११ या काळात दिल्लीवर कंपनीचे राज्य नव्हते. आणि याच कालखंडात ज्या सामाजिक जगामध्ये एतद्देशीय संस्था पुन्हा एकदा भरभराटीला येऊ शकल्या असत्या असे सामाजिक जग नव्याने निर्माण करण्याचा हृदयस्पर्शी पण बावडा प्रयत्न येथील हिंदुमुसलमान जमातीने केला होता

जे मीरत येथे घडले तेच कानपूर येथे घडले. व ते सुद्धा मीरतच्याच क्रमाने. मीरतच्या उठावात नव्या समाजाच्या स्थापनेचा जो यत्न झाला त्याचा केंद्रबिंदू दिल्लीचा बादशहा होता. कानपूरच्या उठावात पुनरुज्जिवित एतद्देशीय समाजाचा केंद्रबिंदू बादशहाऐवजी नानासाहेब पेशवा होता. एवढाच काय तो या दोन घटनातला ठळक फरक. काही गोष्टीत दिल्लीच्या बादशहापेक्षा नानासाहेबांची बाब अधिक उल्लेखनीय; तसेच १८५७ चा उठाव हे स्वातंत्र्य-युद्ध नव्हते वा ती केवळ शिपायांची भाऊगर्दी नव्हती तर तो येथील लोकांचा देशाचे पुनरुज्जीवन घडवून आणण्याच्या प्रयत्नाचा भाग होता हा आपला प्रबंध सिद्ध करणारी होती – नानासाहेब धर्माने हिंदू होते. परंतु त्यांचे मूळ ठिकाण विचारात घेतल्यास ते मराठी म्हणजे दक्षिणी ब्राह्मण राज्यकर्ते होते. कानपूर हे ठिकाण उत्तर हिंदुस्थानात आहे म्हणून वंशदृष्टया विचार केल्यास असे म्हणता येईल की, कानपूर येथे ज्या शिपायानी व जनतेने बंड केले त्या शिपाई व जनतेपेक्षा नानासाहेब पेशवे हे वंशदृष्टया भिन्न होते. असे असूनसुद्धा उठावानंतर हे भिन्नवंशीय शिपाई व नागरिक नेतृत्वासाठी परवया नानासाहेबांकडे वळले. याचे कारण हे होते की, येऊ घातलेल्या सत्य-युगाच्या उत्साहाने भारलेल्या स्थितीत कोण कोणत्या वंशातला आहे या विचाराला क्षुल्लकसेदेखिल महत्त्व असत नाही. म्हणूनच नानासाहेब दक्षिणेकडचे की, उत्तरेकडचे या गोष्टींची दखल उठाव करणारांनी घेतली नव्हती. अशा क्षुद्र भेदभावना त्यांच्या हिशेबी कवडीची देखिल किंमत नव्हती. त्यांच्या उठावाला नेता हवा होता आणि नानासाहेब हे त्या पारंपारिक नेत्यापैकी एक होते. त्यांच्या घराण्याने आजवर लोकांचे राजकिय व सांस्कृतिक नेतृत्व केले होते आणि नानासाहेब उठाव करणारांचे देशबांधव होते; सनातन संस्कृतीचे ते प्रतीकचिन्ह होते एवढ्या गोष्टी त्यांच्या दृष्टीने पुरेशा होत्या

ब्रिटिशांचे साम्राज्य फारच बलिष्ट आहे. त्यांच्याबरोबरच्या लढाईत आपला टिकाव लागणार नाही. अशी टक्कर घेण्यात आपण स्वतःचे नुकसान करुन घेत आहोत. आपले प्रयत्न निष्फळ होण्याची शक्यता आहे. जर तसे घडले तर आज आपणाला जी आर्थिक सुरक्षितता आहे (उदा. ८,००,००० रुपयांचे वर्षासन) तिच्यावरही उद्या पाणी सोडावे लागेल. असे वाटल्याने उठावात सामील व्हावयास प्रारंभी नानासाहेब कां, कू करीत होते अशी माहिती देणारा बराच पुरावा उपलब्ध आहे. परंतु बंडाच्या घुमश्चक्रीत एकदा ओढले गेल्यानंतर पुढे कसल्याही प्रकारची टंगळमंगळ नानासाहेबानी केलेली नाही. आणि दिल्लीच्या बहादुरशहाप्रमाणेच प्रसंगाला पुरी पडण्याचा आटोकाट प्रयत्न त्यानी केल्याचे दिसते.

नानासाहेबानीदेखिल एतद्देशीय सांस्कृतिक व राजकीय संस्था पुनरुज्जीवीत करण्याचा प्रयत्न केला. एवढेच नव्हे तर बंडाच्या अगदी सुरवातीला त्यांच्या सभोवती जे सैन्य जमा झाले होते ते सैन्य व बेगम हजरत हिचे सैन्य अशी दोन्ही सैन्ये एकत्रित करून त्यांच्या मदतीने लखनौच्या रेसीडेन्सीत अडकून पडलेल्या इंग्रजांवर हल्ला चढविण्याचा आणि मागाहून जेव्हा बंड मोडून काढण्यासाठी इंग्रज सैन्य औधवर चालून आले तेव्हा त्या सैन्याला धैर्याने तोंड देण्याचा सुद्धा पराक्रम नानासाहेबानी केला.

लखनौ आणि कानपूर या दोन नगरीत फक्त ४५ मैलांचे अंतर आहे. उठावानंतर या दोन नगरीत ह्या दोन पुढाऱ्यानी ज्या सुधारणा करण्याचा प्रयत्न केला त्या सुधारणांचे स्वरूपसुद्धा पुनरुज्जीवनवादी होते. नानानी हिंदूंसाठी ब्रिटिशपूर्व जुना गुन्हेगारी कायदा परत सुरू केला तर मुसलमानांसाठी तशाच प्रकारचा मुसलमानी कायदा सुरू केला. हीच गोष्ट बेगम हजरत हिनेही केली. बेगम हजरत हिने बिर्जिस काद्र या स्वतःच्या अल्पवयी मुलाला आपल्या नवऱ्याचा वारस म्हणून ७ जुलै रोजी गादीवर बसविले. व ती स्वतः रीजंट म्हणून काम पाहू लागली. याच वेळी तिने असेही जाहीर केले की, काद्रचे दरबारी सल्लागार येथून पुढे दिल्लीच्या मोगल बादशहाशी राजनिष्ठ राहतील. नाना व बेगमेच्या हाताखालच्या बंडखोर शिपायानी ब्रिटिश सैन्याशी अटीतटीची लढाई दिली, परंतु शेवटी त्याना हार खावी लागली. इंग्लंडशी तुलना करता त्यांच्यापाशी असलेली लढाईची सामुग्री व नेतृत्व थिटेच होते. त्यामुळे इंग्रजाबरोबरच्या लढाईत ते फार काळ टिकाव धरू शकले नाहीत. तथापी इंग्रजाविरुद्ध आपण बंड केले याची खंत नानासाहेबानी शेवटपर्यंत कधी वाटू दिली नाही. नेपाळ व हिंदुस्थानच्या सरहद्दीवरच्या ओसाड प्रदेशात एक निर्वासित म्हणून त्याना मरण आले.



अनुक्रमणिका

इंग्रजांविरुद्ध येथील ज्या मातबरानी उठाव केला त्यात झाशीच्या राणीचा अंतर्भाव मी शेवटी करीन. राष्ट्रवादी विचारसरणीवर भर देणाऱ्या विद्वानानी झाशीच्या राणीला जरी नव्या जोन ऑफ ऑर्कच्या पदावर नेऊन बसविले असले तरी तिच्या कर्तृत्वाचा नेमका व अचूक अर्थ पुनरुज्जीवनवादी चळवळी-संबंधीच्या बौद्धिक चौकटीतच खरोखरीने मिळू शकतो. या बाबतीत नानासाहेबांशी तिचे खूपच साम्य आहे. वर आपण हे पाहिलेच की, बंडखोरीच्या कार्यक्रमात नानासाहेब देखील जे पडले ते प्रथमतः स्वतःच्या स्वतंत्र विचाराने नव्हे; तर त्यांच्या भवताली देशाच्या पुनरुज्जीवनाच्या ज्या सामुदायिक चळवळीने जोर धरला होता त्या चळवळीच्या रेट्यामुळे होय. नाना आणि झाशीची राणी ज्या परिस्थितीत उठावात सामील झाले त्या परिस्थितीत व ज्या प्रकारे शेवटी त्यांची अखेर झाली त्यात अशा दोन्हीतही सारखेपणा आहे.

बेगम हजरतप्रमाणेच राणीदेखील तिच्या अज्ञान दत्तक मुलाची कारभारीण म्हणूनच झाशीचा कारभार चालवित होती. गादीला औरस वारस नाही तर निदान दत्तक वारस तरी असावा नाहीतर आपले संस्थान ब्रिटिश राज्यात सामील केले जाईल. या भीतीने मृत्युशय्येवर असताना तिच्या पतीने हा दत्तक घेतला होता. परंतु हा दत्तक ना ब्रिटीशाना मान्य होता ना झाशीच्या राज-घराण्यातल्या इतर गटाना मान्य होता. या कारणाने १८५७ मध्ये (गुल्ड यानी दिलेले १८५७ हे साल चुकीचे आहे ते १८५४ असे हवे. अनुवादक) तेव्हाचा गव्हर्नर जनरल लॉर्ड डलहौसी याने झाशी संस्थान खालसा करून ब्रिटिश राज्यास जोडले. राणीला भरपूर निवृत्तीवेतन सुरु करण्याचे आश्वासन दिले. या निर्णयाविरुद्ध राणी थेट लंडनपर्यंत भांडली. परंतु नानासाहेबांप्रमाणेच तिलाही त्यात अपयश आले. तेव्हा मोठया नाखुषीने ती कारभारातून "निवृत्त" झाली.

झाशीमध्ये १२ व्या नेटिव्ह इन्फन्ट्रीचा तळ होता. या तळावरुन जूनमध्ये बंडखोर शिपायांचा एक नोकर राणीसाठी खलिता घेऊन आला की, संपूर्ण बंगाली लष्कराने ब्रिटिशांविरुद्ध उठाव केला असून जे कोणी आमच्यात सामील होणार नाहीत ते एकतर जातीबहिष्कृत आहेत किंवा काफिर म्हणजे धर्माचे शत्रू आहेत. ६ जून रोजी १२ व्या नेटिव्ह इन्फन्ट्रीने उठाव केला व खजिन्यातल्या ४,५०,००० रुपयांचा ताबा घेतला शिपायानी उठाव केल्याने जे युरोपियन त्या भागात होते त्याना पळून किल्ल्यात आश्रय घ्यावा लागला. किल्ला हेच या भागाचे लष्करीदृष्टया वैशिष्टय होते. पुढे जेव्हा

आम्ही शरण आलो आहोत हे सांगण्यासाठी हेच युरोपियन किल्ल्याबाहेर आले तेव्हा त्या सर्वांची सरसकट कत्तल केली गेली.

वरील घटना घडत असताना राणी तटस्थ राहिली होती असे वाटते. तिच्या समोर पेच होता. शिपायाना सहानुभूती न दाखवावी तर ते विरुद्ध जाणार आणि शिक्षा करणार. बरे शिपायांच्या बनावात सामील व्हावे व त्याना मदत करावी तर इंग्रज शिक्षा देणार. राणीच्या त्या वेळच्या एकूण हालचालीवरून असे वाटते की, या पेचातून बाहेर येण्यासाठी जमेल तितके दिवस दोन्ही पक्षांना खूष ठेवावे आणि पुढे प्रसंग पाहून काय तो मार्ग स्वीकारावा व या कठीण पेचातून स्वतःची सुटका करून घ्यावी असे तिने ठरविले होते. ज्या युरोपियन लोकांची शिपायानी पुढे कत्तल केली त्या किल्ल्यातल्या युरोपियनांच्या प्रमुखाला पत्र पाठवून शिपायाना शरण जाण्यासाठी त्यांचे मन वळविण्याचा प्रयत्न तिने केल्याचे दिसते. पत्रात ती लिहिते की, "मी काय करू ? शिपायानी मला कोंडले आहे. ते म्हणतात की, मीच तुम्हा लोकाना लपवून ठेवले आहे. तेव्हा मीच तुमच्याकडून किल्ला खाली करून घ्यावयास हवा. व त्याना मदत करावयास हवी. स्वतःला वाचविण्यासाठी मी त्याना माझे शिपाई व तोफा दिल्या आहेत. तुम्हाला जर स्वतःला वाचवावयाचे असेल तर किल्ला खाली करा. कोणीही तुमच्या अंगाला हात लावणार नाही."[१३]

युरोपियनांची कत्तल ज्या शिपायानी केली ते पुढे मीरतवाल्या सैनिकांप्रमाणेच दिल्लीच्या वाटेला लागले. मात्र त्या आधी राणीकडून त्यानी बरेच द्रव्य उपटले. कंपनी सरकारने कत्तलीबद्दल राणीला जबाबदार धरले. आणि राणी बंडखोर आहे असे जाहीर केले. एवढे घडल्यानंतर उठावात सामील होण्यावाचून राणीला इलाजच उरला नव्हता. व तेच तिने मोठ्या उत्साहाने आणि आवेशपूर्ण रीतीने केले. राणीने देखिल नानासाहेबांप्रमाणेच पुनरुज्जीवनवादी नेत्याची भूमिका हळूहळू आत्मसात केली. एक कुशल लष्करी सेनानी म्हणून उठावाच्या शेवटी शेवटी राणीने खूपच तेज आणि कर्तबगारी दाखविली. एका हातघाईच्या लढाईच्या प्रगतीची पाहाणी करीत असताना ग्वालेरनजीक १८५८ साली राणीचा अंत झाला.

---

१३ सुरेंद्रनाथ सेन, १८५७ (न्यू देल्ही : गव्हर्मेंट ऑफ इंडिया पब्लिकेशन्स डिव्हिजन, १९५७).



अनुक्रमणिका

उठावाच्या प्रारंभापासूनच राणीच्या बाबतीत असे दिसून येते की, राणी ब्रिटिशांवर जरी मनातून असंतुष्ट होती आणि हिंदुस्थानातून ब्रिटिशांचे काळे झाल्यास जरी तिला ते नकोसे नव्हते तरी सुद्धा तिने स्वतः पुढाकार घेऊन ब्रिटिशाविरुद्धच्या कोठल्याही गुप्त कटाला प्रोत्साहन दिले नव्हते. त्या काल-खंडात पुनरुथ्थानाची जी प्रचंड चळवळ हिंदुस्थानात घडून आली होती त्या चळवळीची ती स्वाभाविक बंदीवान होती. ब्रिटिशांची ख्रिस्ती युरोपिय संस्कृती आणि येथली मुळची हिंदुस्थानी संस्कृती या दोन संस्कृतीमधला ताप आणि विसंवाद दुःसह झाल्याने येथील लोक व ब्रिटिश लष्करातले हिंदी शिपायी ज्या सनातन समाज व्यवस्थेच्या पुनर्प्रस्थापनेसाठी हाकाटी पिटित होते त्याच सनातन समाजव्यवस्थेची राणीदेखिल पुरस्कर्ती होती. त्या काळातले इतर नेतेसुद्धा तेच करीत होते. बहादुरशहा, नानासाहेब, बेगम हजरत आणि (जागेच्या अभावामुळे इतर ज्या अनेकांचा साधा नामोल्लेखही येथे आपण करू शकलेलो नाही. त्या) हिंदी राजेरजवाडयांपैकी इतर अनेकांप्रमाणेच राणीलासुद्धा तिच्या भवताली सुरू झालेल्या पुनरुज्जीवनवादी चळवळीच्या दबावाला घाबरून सनातन संस्कृतीच्या रक्षकाची पारंपरिक भूमिका स्वीकारावी लागली होती. दुर्दैवाने पाठामागची खूपच वर्षे येथील राजेरजवाडे या भूमिकेपासून दूर सरकले असल्याने त्यांच्या त्या भूमिकेत राजकीय जिवंतपणा उरला नव्हता; ही मंडळी नेत्याची स्वतःची भूमिका जवळपास विसरून गेली होती. आजूबाजूचे सगळे वातावरण बंडाच्या हवेने तापत चालले होते. जनतेला उन्माद चढत होता. परिणामतः या सगळया द्विधामनस्क दुर्दैवी मंडळीना त्या लढाऊ आणि तप्त वातावरणाला साजेशी भूमिका नव्याने गिरवावी लागली होती. शेवटी शेवटी तर हे सर्व लोक धर्म व संस्कृतीरक्षकाच्या त्या नव्या भूमिकेशी इतके तद्रूप झाले व लवकरच अवतरणार अशी ज्याची हाकाटी होत होती त्या सत्ययुगाच्या स्वप्नकल्पनेने इतके भारले गेले की, आपल्या आयुष्याचे खरे इतिकर्तव्य ते हेच आहे आणि तेच कर्तव्य बजावण्यासाठी आपणाला हा मानवदेह लाभला असे त्याना स्वतःलाच मनापासून वाटू लागले व ती भूमिका खरी करण्यासाठी ते प्राणाची बाजी लावित राहिले.

१८५७ चा ब्रिटिशांविरुद्धच्या उठावांचा तो प्रयत्न फसला आणि तो फसणार हे जणू आधीपासूनच ठरून गेले होते. कारण जी संस्कृती चोहो बाजूनी मार खात होती त्या मार खाणाऱ्या संस्कृतीने पूर्ण पराभूतीपासून स्वतःला वाचविण्यासाठी जीवाच्या आकांताने केलेला प्रयत्न म्हणजे तो उठाव होता. आणि त्याचे खरे स्वरूप हे स्वप्नरंजनाचे होते. त्यामुळे वाऱ्यावर विरून



अनुक्रमणिका

जाणाऱ्या इतर स्वप्नरंजनांप्रमाणेच हे हिंदी स्वप्नरंजनदेखील विरून गेले होते. मार खाणाऱ्या आणि प्रतिकार करू पाहाणाऱ्या या संस्कृतीचा शत्रूच महाबलाढ्य होता. ज्या सत्तेच्या दिमतीला तत्कालीन सगळ्या तंत्रवैज्ञानिक शक्ती दोन्ही हात जोडून उभ्या होत्या त्या निर्घृण सत्तेसमोर आणि आधुनिक जगातील झपाट्याने वर चढू लागलेल्या ज्या साम्राज्यवादाच्या ताऱ्याच्या सेवेत ही सत्ता होती त्या प्रबल ताऱ्यासमोर या स्वप्नरंजनाचा पाड लागणे शक्य तरी होते काय ?

१८५७ सालचा इंग्रजांविरूद्धचा हिंदी जनतेचा उठाव हा माझ्या मते पुनरुज्जीवनवादी चळवळीचा प्रकार होता. येथील राजेरजवाड्यांचा इंग्रजांविरुद्धचा तो गुप्त कट नव्हता; तसेच येथील लोकांचे ते स्वातंत्र्ययुद्धसुद्धा नव्हते. ( अर्थात या दोन्ही प्रकारची काही लक्षणे त्या चळवळीत आढळू शकतात. उदा. काही प्रमाणात त्यात कट व राजकीय कारस्थानाचा भाग आहे तसेच ब्रिटिशांच्या अंमलाखालून बाहेर पडून पुन्हा आपल्या लोकांचे राज्य प्रस्थापित करण्याचे प्रयत्नसुद्धा त्यात काही प्रमाणात आढळतात. ) मला असे खात्रीपूर्वक वाटते की, हिंदुस्थानातील इंग्रजांविरुद्धच्या या उठावाचा खोलात जाऊन जो कोणी विचार करील तो शेवटी माझ्याच निष्कर्षाप्रत येईल व असे म्हणेल की, ही एक एतद्देशियांची पुनरुत्थानाची चळवळ होती. अर्थात इतर आदिम व अप्रगत समाजातील ज्या चळवळींचा उल्लेख मागे आपण केला त्या चळवळी व ही हिंदी चळवळ किंवा उठाव यात महत्वाचे फरक आहेत. इंग्रजांविरुद्धच्या या उठावाच्या चळवळीत असा कितीतरी भाग आहे की, जो आदिम समाजातल्या वर उल्लेखिलेल्या चळवळीत दृष्टीस पडत नाही. परंतु एवढ्यामुळे ही चळवळ हे काहीतरी अजिबात वेगळेच होते असे नव्हे. हे फरक विचारात घेता आपण फक्त एवढेच म्हणू शकतो की, पुनरुज्जीवनवादी चळवळींचा हा एक वैशिष्ठ्यपूर्ण प्रकार होता.

१८५७ सालची हिंदुस्थानातील इंग्रजांविरुद्धची सामुदायिक चळवळ आणि अमेरिकेतल्या वेस्टर्न प्लेन्स भागातल्या रेड इंडियन जमातींनी ' घोस्ट डान्सच्या' स्वरुपात परक्या वसाहतवाद्यांविरुद्ध केलेले प्रयत्न या दोन चळवळी मूलत: पुनरुज्जीवनवादी असल्या तरी त्यात फरक दिसून येतो ही गोष्ट खरी. परंतु या फरकाचे कारण हे आहे की, हे दोन्ही समाज सांस्कृतिकदृष्ट्या अत्यंत वेगवेगळ्या पायरीवर असताना तेथे या चळवळी घडून आल्या आहेत. हिंदुस्थानात जेव्हा हा उठाव घडून आला तेव्हा हिंदुस्थान सांस्कृतिकदृष्ट्या चांगलाच पुढारलेला होता. उलट रेड इंडियन समाज तितकाच मागासलेला



अनुक्रमणिका



होता. सांस्कृतिकदृष्ट्या हिंदुस्थानी समाज आदीम म्हणता आला नसता एवढेच नव्हे तर हिंदुस्थानात जरी भिन्नभिन्न समाज त्या काळी वावरत होते तरी ते सर्व समाज सांस्कृतिकदृष्ट्या वरच्या दर्जाचे होते. आणि कोठल्याही निकषाने त्याना आदिम समाजाच्या साखळ्या असे म्हणता आले नसते. 'घोस्ट डान्स' चळवळीतल्या समाजाना तसे म्हणता येते. कारण रेड इंडियन लोकांचे ते सगळे भिन्न समाज आदिम समाजाच्याच साखळ्या होत्या. कारण त्यांची सांस्कृतिक पातळी अप्रगत होती.

पुनरुज्जीवनवादी चळवळी या शेवटी राजकीय प्रक्रियेच्या स्वरुपाच्या चळवळी असतात. कारण त्यांचे अंतिम उद्दिष्ट राजकीय असते. काही एका सामुदायिक कार्यक्रमासाठी एतद्देशीय लोक त्या चळवळीत संघटित होत असतात. अशा प्रकारे संघटित झालेले लोक काही राजकीय उद्दिष्टांसाठी खटपट करतात. आणि राजकीय उद्दिष्टांसाठी संघटित होणाऱ्या चळवळीच फक्त पुनरुज्जीवनवादी चळवळीत मोडतात. या चळवळींचा रोख सामान्यतः त्या देशात ठाण मांडून बसलेल्या परकी समूह वा लोकसमुदायाविरुद्ध असतो. एतद्देशीय समाजाला त्या परकी समाजाची भीती वाटते. एतद्देशीय लोकाना असे वाटते की, तो परकी समाज आपली सगळी पुरातन संस्कृती खाऊन टाकू पाहात आहे; परकी समाजाच्या ज्या काही हालचाली सुरु आहेत त्या हालचाली आपला देवधर्म, आपले परंपरागत आचारविचार कायमचे नष्ट करुन टाकण्यासाठी आहेत. तेव्हा वेळीच जर या हालचालीना आपण प्रतिबंध केला नाही तर या भूतलावर आपली नावनिशाणीसुद्धा उरणार नाही.

परकी समाज आपल्या समाजाचे, संस्कृतीचे, देवधर्माचे स्वत्वहरण करु पाहात आहे या भीतीपोटी एतद्देशीय (म्ह. नेटिव्ह) समाज परकी समाजाविरुद्ध धार्मिक–राजकीय स्वरुपाचा लढा उभारतो.

अन्य देशात जाऊन तेथे स्थायिक होऊ पाहाणाऱ्या परकी, राजकीय शक्तीविरुद्ध हा जो सामुदायिक चळवळींसारखा लढा देशी लोक देतात त्या लढ्याचे सर्वसाधारण स्वरुप देशी संस्कृतीच्या भौतिक आणि बौद्धिक स्वरूपावर अवलंबून असते. कारण त्या चळवळीची बौद्धिक बैठक तेथल्या प्रस्थापित समाजाच्या बौद्धिक बैठकीवर अवलंबून असते. उदा. बौद्धिक व सांस्कृतिकदृष्ट्या अप्रगत समाज ज्या प्रकारच्या कल्पना, घोषणा, प्रतीके लढ्यासाठी वापरील त्याच्यापेक्षा वेगळ्या कल्पना, घोषणा व प्रतीके सांस्कृतिकदृष्ट्या वरच्या दर्जाचा समाज वापरील. असे लढे कधीही एकट्या दुकट्याचे नसतात, ते सामुदायिक असतात. त्यामुळे सामुदायिक संकेतांचा पडसाद

तेथे अटळ असतो. शेवटी सामुदायिकपणे जे काही कोठलाही समाज करील ते स्वतःच्या सामुदायिक वकुबाच्या मर्यादेत राहूनच तो करील.

या चळवळींचे पहिले महत्वाचे लक्षण म्हणजे या चळवळी विरोधासाठी केल्या गेलेल्या असतात. तेव्हा विरोध हे त्यांचे प्राथमिक कार्य आहे. अर्थात सामुदायिक विरोध म्हटला म्हणजे समुदायाचे संघटन अपरिहार्य आहे. आणि हे संघटन घडवून आणण्याच्या काही क्लुप्त्या आहेत. आपल्या देशात स्थायिक होऊ पाहाणाऱ्या राजकीय शक्तींच्या विरोधात आपले लोक संघटित करण्यासाठी आपल्या लोकाना नव्या उत्तम राजवटीचे आमिष दाखवावे लागते. परका समाज ज्या सुखी राजवटीचे आमिष एतद्देशीय लोकाना दाखवित असेल त्या आमिषाच्या तोडीस तोड, नव्हे काकणभर सरस असे खरे वा काल्पनिक समाजचित्र तेथील लोकांसमोर मांडता आले तरच तो लोकसमुदाय लढ्यासाठी संघटित होणे शक्य असते. तेव्हा लोक लढ्यासाठी संघटित करायचे म्हणजे भावी सुखी व संपन्न समाजाचे चित्र त्यांच्यासमोर मांडून त्या चित्राच्या नावे लढ्यासाठी संघटित होण्याची हाक त्याना देणे. म्हणजे लोक आकर्षित करील अशा प्रकारचे समाजचित्र शोधून काढणे हे लढ्याच्या मार्गावरचे पहिले पाऊल आहे. असे चित्र मिळाले की, त्या चित्राच्या नावे आवाहन करून लोकाना संघटित लढ्यासाठी एकत्र आणता येते.

हे चित्र एखादा समाज स्वतःच्या गौरवास्पद भूतकाळाकडून मिळविल. किंवा जर ते शक्य होण्यासारखे नसेल तर कल्पनेतून तसे चित्र रचील. ज्या समाजाला संपन्न भूतकाळ आहे, बऱ्यापैकी पुढारलेली संस्कृती आहे त्या समाजापाशी सुखी आणि संपन्न समाजाचे काल्पनिक वा खरे पण स्वतःचे पूर्वीचे नमुने असतील. असा समाज लढ्यात उतरताच या काल्पनिक वा खऱ्या भूतकालिक आदर्शाचा हवाला देऊन स्वतःचे बंड संघटित करील. परंतु एखाद्या समाजापाशी असा संपन्न भूतकाळ नसेलसुद्धा ! आणि संपन्न भूतकाळ नसल्याने अशा प्रकारच्या समाजाची कल्पनाचित्रेसुद्धा त्या समाजापाशी नसतील. अशावेळी तेथे जे बंड घडविले जाईल त्या बंडाला स्फूर्ती त्या समाजातील प्रेषित नेता वा नेते मंडळी देतील. जेव्हा पुनरुज्जीवनवादी लढे हे पूर्वीच्या इतिहासाला आवाहन न केले जाता नव्यानेच घडविले जातात तेव्हा शेवटी ते कोठल्या प्रकारचे वळण घेणार ही गोष्ट त्या लढ्यांमागील प्रेषितांच्या आचारविचारांवर ठरते. त्या लढ्याना पारंपरिक आधार नसतो. प्रेषितांची लहर हा त्यांचा आधार असतो. कारण स्वतःच्या वैयक्तिक कल्पनाशक्तीतून प्रेषितानी त्या लढ्याना येथे स्फूर्ती दिलेली असते.



अनुक्रमणिका

अशा वेळी काय वाटेल ते घडू शकते. पुनरुज्जीवनवादी चळवळ अंती कोठले वळण घेईल याबद्दल एखादा सर्वसाधारण नियमच मांडायचा झाला तर तो पुढील शब्दात मांडता येईल. आजूबाजूचे सांस्कृतिक जग संघटित करून या प्रकारच्या लढाऊ चळवळी केल्या जातात म्हणून ज्या भावी संपन्न राजवटींच्या कल्पनाचित्राच्या नावे या चळवळी संघटित केल्या जातात त्या प्रकारचे कल्पनाचित्र तयार करता येईल अशी आधीची सांकृतिक सामग्रीच जर त्या विशिष्ट समाजापाशी नसेल तर नव्याने उदयास येणारे प्रेपित त्या चळवळीच्या अग्रभागी असतील व तिची दिशा ठरवतील. परिणामी ती चळवळ वाटेल ते विक्षिप्त रूप घेईल.

साध्या आणि गुंतागुंतीच्या समाजात घडून येणाऱ्या पुनरुज्जीवनवादी चळवळींच्या स्वरुपातला भेद लक्षात येण्यासाठी माझ्या मते वरील मुद्दा खूपच महत्वाचा आहे. या प्रकारच्या चळवळींचा अगदी प्रथमच ज्यानी अभ्यास केला त्यानी नेमका हाच मुद्दा दुर्लक्षित केला आहे. वस्तुत: या चळवळींचे कार्य राजकीय स्वरुपाचे असते. परक्या राजकीय सत्ताना विरोध करण्यासाठी स्थानिक लोकानी घडवून आणलेल्या त्या चळवळी असतात. त्यामुळे त्यातील संघटन हे राजकीय मुद्यावर घडविले गेलेले असते. हे राजकीय संघटन कोठल्या मुद्यावर व कशा पद्धतीने घडवून आणण्यात येते याचाच विचार पूर्वीच्या संशोधकानी केलेला नाही. विशेषत: अशा प्रकारच्या चळवळींच्या वॉलेस या अगदी पहिल्या अभ्यासकाच्या अभ्यासात तर ही उणीव फारच प्रकर्षाने जाणवते. या चळवळींच्या मानसिक, सांस्कृतिक, मरणोत्तर जगासंबंधिच्या कल्पना इत्यादी अनेक बाबींचा विचार वॉलेस यानी केला आहे. परंतु या चळवळींच्या नावे जो जमाव एकत्र झाला होता तो तसा कशा पायी एकत्र झाला होता या प्रश्नाबद्दल त्यांच्या अभ्यासात एक साधा शब्दमुद्दा आढळत नाही.

वॉलेस यानी या प्रकारच्या चळवळींच्या अनेक अंगांचा अभ्यास केला आहे व ही अंगे फार महत्वाची होती ही गोष्ट कोणीही नाकारणार नाही. उदा. चळवळीची मानसिक व सांस्कृतिक बैठक, तसेच मरणोत्तर जगासंबंधीच्या म्हणजेच स्वर्गनरक मोक्षादिच्या ज्या कल्पना त्या चळवळीने स्वीकारलेल्या असतात त्या कल्पनाना चळवळीच्या जडणघडणात व भवितव्यात महत्व आहे हे कबूलच करावयास हवे. कारण ती चळवळ कोठल्या प्रतीकांवर चालणार; तसेच तिच्यात सामील झालेल्या लोकाना भावनिक समाधान देण्याच्या बाबतीत त्या चळवळीची एकूण संभाव्य शक्ति किती हे सगळे याच घटकांवर ठरत

असते. परंतु वॉलेस यानी फक्त एवढयाच बाबींवर स्वत:चे लक्ष केंद्रित केले आहे. आणि राजकीय स्वरूपाचे जे संघटन या चळवळीत दिसून येते त्याच्याकडे संपूर्ण दुर्लक्ष केले आहे. हे दुर्लक्ष होण्याचे कारण हे आहे की, या जातीच्या चळवळींचा विचार करताना साध्या व फारशा गुंतागुंती नसलेले प्राथमिक स्तरावरचे समाज व त्यातील चळवळी आणि गुंतागुंतीच्या आणि वरच्या स्तरावरचे समाज व त्यातील चळवळी या दोन प्रकारच्या चळवळीत काहीच फरक केला गेलेला नाही. परंतु वस्तुस्थिती विचारात घेता असा फरक करणे आवश्यक आहे. कारण दोन्हीकडे या चळवळी घडल्या असल्याचे व राजकीय उद्दिष्टांसाठी त्या केल्या गेल्याचे आपण पाहातो. तेव्हा राजकीय उद्देशाचाही अंतर्भाव चळवळींच्या अभ्यासात केला जावयास हवा. तरच या चळवळींचा सांगोपांग अभ्यास झाला असे म्हणता येईल.

पुनरुज्जीवनवादाच्या चळवळीत मानसिक, सांस्कृतिक घटक आणि परलोकासंबंधिच्या तेथल्या जनतेच्या कल्पना या सर्वांना जरी कितीही महत्व असले आणि त्यांचा अभ्यास करताना या तिन्ही बाबींना आपण महत्व दिले पाहिजे हे जरी कितीही खरे. असले तरी अनुभव असा आहे की, चळवळीतून होऊ शकणाऱ्या राजकीय लाभालाभाच्या प्रमाणात वरील तीनही घटक सारखे बदलत असतात. उदा. हिंदी जनतेचा ब्रिटिश सत्ताधाऱ्यांशी जेव्हा लढा सुरू झाला तेव्हा हिंदुस्थानातील हिंदु-मुसलमानात धार्मिक-सांस्कृतिक भेदाभेद असूनसुद्धा ब्रिटिशाना विरोध या एका बाबतीत तडजोड होऊ शकली. सहकार्याच्या इच्छेने हिंदु मुसलमान निकट आले. पूर्वी हेच लोक परस्परांशी फटकून वागत असत. परंतु आता समान शत्रुशी लढाई करायची असल्याने ते एक झाले. या एका गोष्टीचा परिणाम होऊन चळवळीच्या मानसिक व सांस्कृतिक आशाआकांक्षा आणि मरणोत्तर लाभालाभाविषयीच्या कल्पना या सर्वांत बदल घडून आला.

हिंदी जनतेची ब्रिटिश सत्तेबरोबर जेव्हा लढाई सुरू झाली तेव्हा हिंदी जनतेतील हिंदु आणि मुसलमान हे त्या लढाईतील दोन हिंदी भागीदार एकत्र होऊन परक्या ब्रिटिशांशी लढू लागले. १८५७ च्या उठावातील बंडखोर मुसलमान नेत्यानी गोवधबंदीला आपली सार्वत्रिक खुषी दाखविली आणि अशा प्रकारे हिंदुमुसलमान ऐक्याला स्वत.चा प्रतिकात्मक पाठिंबा दर्शविला. हिंदुमुसलमानातील ही दिलजमाई हा त्या विशिष्ठ क्षणीच्या निकराच्या परिस्थितीचा परिणाम होता. राजकीय-संघटन ही त्याच्यामागची प्राथमिक चालना होती. समजा बंडखोरानी ब्रिटिशाना या देशातून कायमचे

चालवून दिले असते व अशा रीतीने ब्रिटिशांचा संपूर्ण बंदोबस्त करण्यात त्यांना यश आले असते तर त्या निकराच्या परिस्थितीनंतर ही दिलजमाई बहुधा पुढे टिकूनही राहिली नसती. कारण तत्कालिक राजकीय दवावाच्या गरजेतून ती दिलजमाई घडून आली होती आणि त्या दिलजमाईमुळे पुनरुज्जीवनाच्या त्या चळवळीचा बाह्य रंग बदलला गेला होता.

ही माझी सर्वसाधारण बौद्धिक भूमिका आहे. या भूमिकेला धरून जे जे काम विशेष पुनरुज्जीवनवादी चळवळीत दिसून येतात त्यांची एक यादी मी खाली देत आहे.

१) देशाच्या पुनरुज्जीवनाच्या चळवळी प्राथमिक स्वरुपाच्या समाजामध्येच फक्त घडून येऊ शकतात असे नव्हे. या जातीच्या चळवळींचा बौद्धिक अभ्यास करण्याची तात्विक चौकट मानवशास्त्रज्ञानी जरी मुळात प्राथमिक स्वरुपाच्या चळवळींच्या अभ्यासावरून तयार केली असली तरी असल्या चळवळी वरच्या दर्जाच्या समाजांमध्येसुद्धा घडू शकतात. जेथे जेथे सामाजिक उलथापालथी व सामाजिक ताणतणाव पराकोटीला पोहोचतात तेथे तेथे त्या संपूर्ण समाजाला वा त्याच्या फार मोठ्या भागाला अशी भीती वाटू लागते की, आता आपला समाज मोडून पडणार, आपल्यावर सांस्कृतिक अनर्थ कोसळणार, आपली संस्कृती मरून जाणार तेव्हा तेव्हा त्या समाजांमध्ये पुनरुज्जीवनाच्या चळवळी घडून येतात. आपला सांस्कृतिक शेवट आता अटळ आहे अशी जी समजूत हिंदुस्थानातील गंगेच्या खोऱ्यातील जातीजमातीत पसरली होती ती ब्रिटीश लष्करातल्या शिपायात केंद्रित झाली. मात्र या घटनेला होकारात्मक आणि नकारात्मक अशी दोन अंगे होती. आपल्या संस्कृतीचे उच्चाटन होऊ घातले आहे ही लोकभावना हे या घटनेचे नकारात्मक अंग होते. या भावनेपोटी लोक भीतीग्रस्त झाले. परंतु त्याच वेळी त्यांच्या अंतर्मनात अशी एक आशादायक भावनासुद्धा उद्दिपित झाली की, या वाईटातून काही चांगले घडणार, आपण कालचक्राच्या टोकाला आलो आहोत आणि टोकाला आलो असल्याने ते कालचक्र पलटी घेणार व आपणाला चांगले दिवस दिसणार. आपल्या भारतवर्षात पुन्हा एकदा सत्ययुग अवतरणार. लोक स्वतःशी असे म्हणत होते की, ज्या अर्थी दुर्दैवाची पराकोटी आज आपण अनुभवीत आहोत त्या अर्थी रहाटगाडग्याच्या नियमाने उद्या सुखाच्या राशिवरसुद्धा आपण स्वार होणार आहोत. फक्त आपल्या देशात ठाण मांडून बसलेले व आपल्या सगळ्या दुर्दैवाला कारण झालेले हे फिरंगी येथून हद्दपार झाले पाहिजेत. सत्ययुगाचे मनसुबे आणि फिरंगी या देशातून घालविले गेल्यानंतर नव्या ठेवणीची

सांस्कृतिक व्यवस्था आणण्याची जी ओढ लोकात तयार झाली होती तिचेही संघटनात्मक केंद्र पुढे हेच बनले.

२) पुनरुज्जीवनाची चळवळ घडून येण्याचे काही ठोकताळे आहेत. सर्वच ठिकाणी या चळवळी घडून येतील असे नव्हे. त्यासाठी काही विशिष्ट परिस्थिती उद्भवावी लागते. मुख्य म्हणजे एका संस्कृतीने दुसऱ्या परक्या आक्रमणवादी संस्कृतीविरुद्धच्या केलेल्या उठावातून या चळवळी घडून येतात. म्हणून प्रथम दोन वेगवेगळया संस्कृती समोरासमोर यावयास हव्यात त्या दोन संस्कृतींमध्ये संघर्ष निर्माण झाला पाहिजे. तंत्रवैज्ञानिक, आर्थिक बाबी आणि सामुदायिक बळ या बाबतीत त्या दोन संस्कृतींमध्ये मोठी तफावत हवी. सारांश, वरील सर्व दृष्टीने विषम असलेल्या दोन संस्कृती जेव्हा स्पर्धेसाठी समोरासमोर ठाकतात तेव्हा त्यात सर्व बाबतीत जी संस्कृती मागे असते त्या संस्कृतीत पुनरुज्जीवनाची चळवळ उद्भवते. या प्रकारच्या चळवळींची अलिकडची उदाहरणे पाहायची झाल्यास ती "साम्राज्यवादाच्या प्रसारातून उत्पन्न झालेल्या भौतिक परिस्थितीत व प्रदेशात" पाहावयास सापडतील. येथे हुकमत आणि त्या हुकमतीची ताबेदारी या दोघांचीही पाळेमुळे अक्षरशः त्या दोन संस्कृतींमधल्या तंत्रवैज्ञानिक विकासातल्या भयानक तफावतीत खोल रुजलेली तुम्हाला दिसतील. येथे जेते जितांची सर्व प्रकारे पिळवणूक करीत असतात. त्यांच्या देशातला कच्चा माल व इतर साधनसामुग्री जवळजवळ लुबाडीत असतात. फुकटात पाडीत असतात. एवढे कमी असते म्हणून की काय तेथील जेत्यांची एकूण प्रवृत्ती जितांना गुलामांप्रमाणे वागविण्याची असते. साहजिकच जित संस्कृतीमध्ये निकराची अवस्था प्राप्त होते. आणि त्या निकराच्या परिस्थितीवर मात करण्यासाठी त्या संस्कृतीमधल्या पुनरुज्जीवनवादी शक्ती संघटीत होऊ लागतात.

इस्ट इंडिया कंपनीचे हिंदुस्थानातील प्राबल्य जेव्हा वाढत होते तेव्हा इतर इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रांतीला प्रारंभ झाला होता. आणि इंग्रजी समाजमानसावर नव्या आर्थिक विचारसरणीचा ठसा मोठ्या जोमाने उमटू लागला होता. उलट येथील समाज जरी बहुरंगी व अनेक बाबतीत पुढारलेला होता तरीसुद्धा इंग्लंडमधील तंत्रवैज्ञानिक प्रगती विचारात घेता खूपच मागे होता असे म्हणावे लागते. तथापी बौद्धिकदृष्टया हा समाज मागासलेला नसल्याने ब्रिटिश राज्यकर्ते या ना त्या प्रकारे आपल्या पारंपरिक सामाजिक आणि सांस्कृतिक व्यवस्थेमध्ये खोलवर ढवळाढवळ करीत आहेत आणि हे करण्यात



अनुक्रमणिका

स्वतःची राजवट, आर्थिक विचारसरणी नैतिक आचारविचार इत्यादी आपल्या अंगवळणी पाडण्याचा व तसं करून आपणाला साम्राज्यशाहीच्या घडीत पूर्णतः जखडून टाकण्याचा त्यांचा डाव आहे ही गोष्ट या समाजाने लगेच ओळखली होती.

३) परकी राजवटीखाली जुलूमजबरदस्ती व दडपशाही होते. तसेच देशी जीवितसाधने परकी राजकर्त्यांच्या मुठीत ठेवण्याचा प्रयत्न होतो. या परिस्थितीची प्रतिक्रिया म्हणजे त्या देशी समाजातील सर्व प्रकारच्या सांस्कृतिक साधनसामुग्रीचे राजकीय स्वरूपाचे लढ्यासाठी होणारे एकत्रिकरण. हे साध्य करण्यासाठी देशी संस्कृतीला परकी व राज्यकर्त्या संस्कृतीविरुद्ध काही ठाम प्रयत्न करावे लागतात. राज्यकर्त्या संस्कृतीने देशी संस्कृतीवर "आक्रमण" केलेले असते. त्या संस्कृतीला कमजोर करण्याचा प्रयत्न केलेला असतो. एवढेच नव्हे तर ती देशी संस्कृती स्वतःमध्ये पार रिचवून टाकण्याचासुद्धा प्रयत्न केलेला असतो. अशा वेळी एतद्देशीय संस्कृतीपुढे फक्त एकच मार्ग असतो तो म्हणजे त्या आक्रमक प्रतिस्पर्धी संस्कृतीपासून स्वतः बाजूला होणे व स्वतःमध्ये पुन्हा जीव निर्माण करणे. यासाठी जित संस्कृतीला दोन गोष्टी कराव्या लागतात. एकतर " प्रतिस्पर्धी " आक्रमक संस्कृतीपेक्षा आपण वेगळे आहोत हे आपल्या लोकांच्या मनावर वारंवार बिंबविणे. तसेच स्वतःच्या संस्कृतीच्या ओजस्वीपणावर जोर देणे. ती सहजी मरू शकणार नाही, तिला कोणी मारू म्हटले तरी त्याला ती मारता येणार नाही या गोष्टीवर भर देणे. " प्रतिस्पर्धी संस्कृतीपेक्षा " आपली संस्कृती भिन्न आणि वेगळी आहे आणि काही झाले तरी ती नष्ट होणार नाही हे देशी लोकाना पटवून देण्याचे काम दोन वेगवेगळ्या पातळीवर केले जाते. सामाजिक पातळीवर स्वतःच्या वांशिक मोठेपणावर आणि श्रेष्ठत्वाच्या अहंकारावर भर देऊन तर सांस्कृतिक पातळीवर आक्रमक समूहांच्या सांस्कृतिक प्रतिकाना, मूल्याना, मरणोत्तर आयुष्याच्या कल्पना वगैरेना झिडकारून लावणाऱ्या आणि विरोधी असणाऱ्या प्रतिकाना, मूल्याना व मरणोत्तर जगाच्या कल्पनाना महत्व देऊन हे करू पाहिले जाते.

१८५७ च्या शिपायांच्या उठावात ज्या हिंदुस्थानी सामाजिक व सांस्कृतिक चालीरीतींचा ब्रिटिशाना मनापासून तिरस्कार होता त्याच चालीरीती पुन्हा पुन्हा उचलून धरण्याचा व सजीव करण्याचा प्रयत्न शिपायानी केला होता ही घटना अत्यंत बोलकी आहे. किंबहुना याच काळात निशस्त्र मुलकी ब्रिटिश मंडळींवर हिंदी शिपायानी क्रूर हल्ले व अत्याचार केले त्यांचा अर्थ आणि हेतुसुद्धा तोच होता. या त्याज्य चालीरीती पुन्हा अंमलात आणून व मुलकी

ब्रिटिशांवर प्राणघातक हल्ले करुन शिपायाना आपल्या लोकाना हेच दाखवून द्यायचे होते की, ब्रिटिशांच्या संस्कृतीपेक्षा आपली संस्कृती सर्वतोपरी वेगळी असून आता आम्ही जागे होत आहो; आमच्या संस्कृतीवर केले जाणारे कसलेही आक्रमण येथून पुढे सहन केले जाणार नाही. ब्रिटिश मुलकी लोकाविरुद्ध केली गेलेली ही कृत्ये अत्यंत भीषण व क्रूर खरी. पण त्या कृत्यांमुळे येथील हिंदी जनतेची एक तीव्र मानसिक गरज भागत होती. या कृत्यांमागील विलक्ष क्रूरतेमुळे ब्रिटिश संस्कृतीबरोबरचा स्वतःच्या संस्कृतीचा वेगळेपणा तर त्यानी स्वतःच स्वतःला पटवून दिला होता. परंतु हा भेद कधीही भरून येणार नाही आणि आता आम्ही स्वतःच्या वेगळेपणाबद्दल जागृत होत आहो हे देखिल त्यानी स्वतःला पटवून दिले होते.

अगदी अशाच प्रकारच्या प्रक्रिया ज्या इतर देशात एतद्देशीय समाज नव्याने वर येऊ पाहात होते तेथेही दिसून आल्या आहेत. जेथे जेथे एखाद्या प्रगत परक्या देशाने दुसऱ्या थोडया मागास समाजावर स्वतःचे वर्चस्व लादले होते आणि जेथे जेथे तेथली देशी जनता त्या वर्चस्वाला विटून प्रतिकार करू पाहात होती तेथे तेथे सार्वजनिक प्रतिक्रियेचा हिंदुस्थानी साचाच नजरेस पडतो. अशा प्रत्येक ठिकाणी ऐतद्देशीय समाज परक्या समाजावरोबरच्या स्वतःच्या वेगळेपणावर अमर्याद भर देतो असे दिसून आले आहे. आपल्यावर वर्चस्व गाजविणाऱ्यांपेक्षा आपण कोणी तरी वेगळे आहोत आणि म्हणून त्या परक्यांचे वर्चस्व काही करून आपण झुगारुन दिले पाहिजे व स्वतःचे वेगळेपण, स्वतःच्या संस्कृतीचे वेगळेपण पुन्हा प्रस्थापित केले पाहिजे अशी भावना या प्रकारच्या घटनात दृष्टीस पडते. हा प्रकार थेट अमेरिकी निग्रोंच्याही बाबतीत निदर्शनास येतो.

एवंच, स्वतःवर अधिकार गाजविणाऱ्या परक्या समाजाला त्या देशातला मूळ समाज दोन वेगवेगळया बाजूनी प्रतिकार करतो असे आपण पाहिले. एकीकडे तो समाज सामाजिक भूमिकेवरुन आक्रमक समाजाला विरोध संघटित करतो. तर दुसरीकडे सांस्कृतिक भूमिकेच्या मदतीने तसाच प्रतिकार तो संघटित करतो. उदा. परक्या समाजाकडून मार खात असलेला समाज स्वतःच्या वंशिक भिन्नतेवर आपल्या लोकांचे लक्ष केंद्रित करुन परक्या आक्रमक समाजाविरुद्ध स्वतःच्या लोकाना उठवितो. तर दुसरीकडून स्वतःचे सांकृतिक रीतीरीवाज, देवधर्म, प्रतीके वगैरे आक्रमकांपेक्षा कसे भिन्न व थोर आहेत हे स्वतःच्या लोकांच्या मनावर वारवार बिंबवून त्याना प्रतिकाराला तयार करतो. आक्रमकांविरुद्ध हे मागास समाज अशी ही दुहेरी लढाई खेळतात.

स्वतःच्या सांस्कृतिक सामुग्रीचा (उदा. सास्कृतिक प्रतीके, देवाधर्मांच्या परलोकाच्या वगैरे कल्पना. इत्यादि ) वापर करुन पडत्या संस्कृती विरोधी संस्कृतीबरोबर कसा लढा देतात याचा सखोल अभ्यास मिर्सा एलियाड या मानवशास्त्रज्ञाने केला आहे. त्याच्या निष्कर्षांवरुन आपणास बरेच काही शिकता येईल. एलिआड म्हणतात की, आपला पाडाव करणाऱ्या परक्या संस्कृतीपेक्षा आपली संस्कृती वेगळी आहे व म्हणून आपण आपला पाडाव करणाऱ्या संस्कृतीला विरोध केला पाहिजे ही दुहेरी भूमिका मेलानेसियन मूळ रहिवाश्यांतल्या 'कार्गो कल्ट' पंथाच्या सृष्टीच्या पुनर्जन्माच्या पुराकथात (मिथ्स्) आपणास पाहावयास सापडते. स्वत.चे सांस्कृतिक भिन्नत्व व म्हणून परक्याना विरोध हे भिन्नत्व आणि विरोध यांचे सूत्र उकलून दाखविताना एलियाड कार्गो पंथवाल्यांच्या एका पुराकथेचा निर्देश करतात. ही कथा मरखान दरीतल्या लोकात प्रसृत आहे. मरखान दरीतले कार्गो पंथवाले हे लोक सेतानाच्या प्रतिमेला स्वतःचा सर्वश्रेष्ठ देव म्हणून भजतात. ही देवता परक्या सत्तेला विरोध करता करता ते भजू लागले आहेत. ही देवता या लोकात कशी उदयास आली हे स्पष्ट करताना एलियाड म्हणतात की, "गोरे लोक या लोकांवर सत्ता गाजवित होते. गोऱ्यानी राजकीय आणि धार्मिक अशा दोन्ही सत्ता बळकावल्या होते. पुढे गोऱ्यांच्या वर्चस्वाविरुद्ध एतद्देशीय लोकानी बंड संघटित केले. या बंडाचा एक म्होरक्या मराफी हा. हा या समाजातला एक प्रेषित किंवा देवाने पाठविलेला लोकांचा वाटाड्या होता. गोऱ्या लोकांविरुद्ध हे लोक लढा देत होते. त्यामुळे मराफी या देवाच्या संदेशवाहकाने गोऱ्यांच्या धार्मिक व राजकीय लुबाडणूकीला विरोध करताना गोऱ्यांविरुद्धच्या उठावाचा नेमका तार्किक निष्कर्ष काढल्याचे दिसते ही मोठी लक्षणीय गोष्ट आहे. कारण मराफीचा परमेश्वर हे गोऱ्यांच्या परमेश्वराचे विरुद्ध टोक आहे. लोकांचा आणि मराफीच्या साक्षात्कारी धर्माचा खरा परमेश्वर हा साहजिकच मराफीचे लोक ज्या गोऱ्यांशी झुंजत होते ते गोरे ज्या देवाला मानीत होते त्या देवांचा प्रतिस्पर्धी म्हणजे गोऱ्यांच्या धर्माप्रमाणे सैतानच फक्त असू शकत होता. "मराफीचे लोक गोऱ्यांबरोबर लढत होते. म्हणून त्यांचा देवसुद्धा गोऱ्यांच्या देवाबरोबर लढणारा म्हणजे गोऱ्यांच्या धर्मातला सैतान हवा. असे मराफीचे तर्कशास्त्र सांगते.

१४ मिर्सा एलियाड –''कार्गो कल्टस'' अँड कॉस्मिक रिजनरेशन मिलेनियल ड्रीम्स इन अॅक्शन–संपादन–सिल्विया एल् थ्रुप (न्यूयॉर्क शॉकेन, १९७०)

४) पुनरुज्जीवनवादी चळवळी वांशिक भिन्नत्वाच्या तत्वावर स्वतःचे अनुयायी संघटित करतात. अर्थात ज्या समाजामध्ये या चळवळी घडतात त्या समाजामध्ये वांशिक भिन्नत्वाच्या तत्वाला आवाहन करण्यावाचून दुसरे गत्यंतरच नसते. कारण ज्याचे अनुकरण करुन अशा चळवळी घडवून आणाव्या असे राजकीय चळवळींचे कसलेच जुने नमुने तिथे माहित नसतात. राजकीय प्रकारच्या चळवळीच तेथे कधी घडलेल्या नसल्याने या चळवळी घडवून आणण्याचे ज्ञानसुद्धा तेथील लोकांपाशी नसते. साहजिकच तेथील लोक धार्मिक चळवळींच्या उदाहरणांकडे वळतात आणि जी काही तुटपुंजी सांस्कृतिक वा धार्मिक साधने व सामुग्री त्यांच्यापाशी असते तिच्या मदतीने चळवळ चालवितात.

औद्योगिकदृष्टया मागास असणाऱ्या समाजाला जेव्हा त्या बाबतीत प्रगत असणाऱ्या समाजाबरोबर लढत देण्याचा प्रसंग येतो तेव्हा तर वर म्हटले ती वस्तुस्थिती फारच प्रकर्षाने ध्यानात येते. कारण प्रगत समाजाबरोबर त्या समाजाच्याच साधनाने भांडता येण्याची शक्यता मागास समाजापाशी असत नाही. तसेच राजकीय लढयाच्या स्वरूपाच्या चळवळी पूर्वी त्या समाजाने कधी पाहिलेल्या नसल्याने त्या चळवळींच्या धर्तीवर स्वतःची चळवळ त्या समाजाला आखता येत नाही. मग राहाता राहिला उपाय एवढाच की, जमेल त्या प्रकारे स्वतःच स्वतःची पद्धत शोधून त्या पद्धतीने चळवळ उभी करणे. अशा वेळी धार्मिक मूल्ये व श्रध्दा आणि निष्ठा त्यांच्या फार उपयोगी पडतात. कारण एकतर त्या समाजातील प्रत्येक मनुष्याला ती माहीत असतात व अंगवळणीही पडलेली असतात आणि दुसरे असे की, आपण सर्व एकाच वंशाचे आहोत या प्रकारच्या वांशिक सूत्रावर लोक एकत्रित करावयाचे झाल्यास धार्मिक विचारसणीइतके दुसरे काहीच अधिक उपयुक्त असू शकत नाही. या प्रकारच्या विचारसरणीना त्या त्या समाजात सार्वत्रिक आवाहन असल्याने त्या आवाहनाखाली तेथील सगळे लोक सहजगत्या एकत्रित होऊ शकतात.

परक्या सत्ताधाऱ्यांबरोबर लढत देण्यासाठी देशी लोकाना चळवळ उभी करायची असली तर त्यांच्या संस्कृती मध्ये राजकीय स्वरूपाच्या चळवळी पूर्वी कधी घडून न आल्याने त्या धर्तीच्या चळवळी मागास समाजाना उभ्या करता येत नाहीत व म्हणून अशा चळवळी त्यांना सांस्कृतिक दिशेने उभ्या कराव्या लागतात. आणि त्यासाठी त्यांच्या संस्कृतीमध्ये जे काही सांस्कृतिक साधन साहित्य मिळेल ते घेऊन ते काम करावे लागते असे वर आपण म्हटले. हे सांस्कृतिक साधनसाहित्य सामान्यपणे तेथील धार्मिक कल्पनांमध्ये व सांप्रदायिक







विचारसरणीत सापडण्यासारखे असते कारण लोक गोळा करायचे तर त्यासाठी त्यांच्या ठिकाणी एकीची भावना निर्माण करून त्याना त्यांच्यापेक्षासुध्दा प्रबल आणि सुसज्ज शत्रूबरोबर संघटित सामुदायिक लढत द्यावयास प्रवृत्त करतील अशी प्रतीके व विचारप्रणाल्या यांची खरी गरज असते. व ही प्रतीके आणि विचार प्रणाल्या हा तर धर्माचा भाग आहे.

तथापी हिंदुस्थानचा विचार करता असे म्हणता येईल की, हिंदी लोकाना राजकीय संस्था कशा बांधाव्यात याचे ज्ञान अगोदरपासूनच होते. तसेच या प्रकारच्या संस्था बांधताना ज्या धार्मिक साधनसाहित्याची गरज असते त्याचासुद्धा समृद्ध आणि मुबलक पुरवठा येथील लोकांच्या हाताशी होता. परंतु एवढी सगळी उत्तम सोय जवळ असतानासुद्धा ती वापरता येण्याच्या बाबतीत एक मोठी अडचण होती. ही अडचण अशी की, ज्या राजकीय संस्थेशी येथील लोकांचा परिचय होता ती राजकीय व्यवस्था मागच्या टप्प्यावरच्या तंत्र-वैज्ञानिक संघटनासाठी ठीक होती पण जे नवे तंत्रवैज्ञानिक ज्ञान ब्रिटिश राज्यकर्ते हाताळीत होते त्याच्याशी तुलना करता ही राजकीय व्यवस्था मागे पडली असती दुसरी अडचण ही होती की, गेली अनेक दशके ही राजकीय व्यवस्था वापरात राहिली नसल्याने तिची मुळे आज जणू सुकून गेली होती. त्यामुळे तिच्या जोरावर राजकीय संघटन कठीण जाणार होते.

अर्थात बंडखोरानी सांस्कृतिक पुनर्बांधणीच्या स्वत:च्या कार्यक्रमात जे जे साहित्य हाताशी लागले ते ते साहित्य व जुनी राजकीय तत्वे वापरण्याचा प्रयत्न केल्याचे दिसते. इतर ठिकाणच्या सागासु समाजानी आपापल्या देशात नवे सत्ययुग प्रस्थापित करण्याचे जे प्रयत्न केले होते ते प्रयत्न आणि हिंदी शिपायांचे सत्ययुगासाठीचे प्रयत्न यात फरक हाच होता. हिंदुस्थानातल्याप्रमाणे सांस्कृतिक पुनरुज्जीवनाचे प्रयत्न इतरही काही देशात केले गेले होते परंतु हे देश औद्योगिकदृष्ट्या अत्यंत मागास होते तसेच त्याना राजकीय पद्धतीची-सुद्धा काही माहिती नव्हती हिंदुस्थान देश त्याच्या प्रतिपक्षीय ब्रिटिश देशाइतका औद्योगिक व तंत्रवैज्ञानिकदृष्ट्या जरी प्रगत नव्हता तरी एतद्देशीय-वादाच्या (नेटिव्हिझम) चळवळी करणाऱ्या इतर देशांइतका अप्रगतसुद्धा नव्हता. हिंदुस्थानातला पुनरुज्जीवनाचा झगडा हा औद्योगिक समाज आणि औद्योगिक नसलेला परंतु इतर बाबतीत अत्यंत गुंतागुंतीचा समाज अशा दोन समाजातला झगडा होता हिंदी पुनरुज्जीवनवादी चळवळीचे हेच मोठे वैशिष्ठ्य आहे आणि या तिच्या वैशिष्ठ्यामुळेच हिंदी चळवळीला या प्रकारच्या चळवळीचा एक खास नमुना म्हणता येईल.



अनुक्रमणिका



हिंदी समाज हा राजकीय दृष्टया मागासलेला नव्हता. येथील लोकांना राजकीय संस्था, विचारसरणी आणि व्यवस्था अवगत होत्या. तसेच सांस्कृतिक व इतर अनेक बाबतीतसुद्धा हिंदी समाज खूपच वरच्या स्तरावर वावरत होता. हिंदी समाजाचे स्वरूप गुंतागुंतीचे होते. त्यामुळे 'घोस्ट डान्स' अथवा 'कार्गो कल्ट' अशा सारख्या पुनरुज्जीवनवादी चळवळीत ज्या चमत्कारिक गोष्टी घडल्या तशा येथे घडल्या नाहीत. हिंदी चळवळीची सूत्रे कधीही प्रेषित वा देवाच्या संदेशाच्या नावाने लोकांना आवाहन करणाऱ्या लोकांच्या हाती गेली नाहीत.

हिंदुस्थान वगळता इतर ठिकठिकाणी जेथे जेथे अशा प्रकारच्या देशाच्या पुनरुथ्थानाच्या चळवळी घडून आल्या तेथे तेथे त्या चळवळींची सूत्रे स्वतःला प्रेषित म्हणवून घेणाऱ्या मंडळींच्या हाती होती. हे धर्मभोळे दृष्टांती (प्रॉफेट्स) भूतलावरील नंदनवनाची आश्वासने आपल्या लोकांना देत. या भूतलावरील नंदनवनात एकदा मरून पुन्हा जिवंत झालेले आणि आता हयात असणारे असे सर्व मिळून एकत्र नांदणार होते.

१८५७ च्या हिंदी चळवळीमध्ये वरील सारख्या धर्मभोळ्या प्रेषित लोकांना स्थान नव्हते. त्यामुळे 'घोस्ट-डान्स' सारख्या चळवळींमध्ये जे विपरीत आणि विक्षिप्त प्रकार आढळून येतात तसले काहीसुद्धा येथे आढळत नाही. या चळवळीच्या मागेसुद्धा धार्मिक भाकिताचा संबंध आहे. पण हे भाकित वरील 'घोस्ट-डान्स' चळवळीतल्या भाकितासारखे चमत्कारिक नव्हते. हे भाकित उद्याच्या पुनरुज्जीवित समाजाचे होते. परंतु या समाजावर राज्य करणारे कोणी मरून परत जिवंत झालेले पूर्वज नव्हते तर ज्यांना राज्य-कारभाराचा अनुभव आहे असे खरे राजपुरुष होते. कारण उठाव करणारांच्या बेताप्रमाणे तिरस्करणीय फिरंग्यांना या पवित्र देशातून बाहेर हाकलून दिल्यानंतर आणि या देशाला त्यांनी लावलेला कलंक दूर केला गेल्यानंतर फिरंग्यांनी ज्यांना त्यांच्या गादीवरून पदच्युत केले होते त्या सर्व हिंदी राजांना त्यांच्या त्यांच्या गादीवर मोठ्या इतमामाने बसविले जाणार होते.

१८५७ च्या उठावासारखाच उठाव जवळपास त्याच वेळी चीन-मध्येसुद्धा घडून आला होता. इतिहासकार त्या उठावाला तायपिंग बंड म्हणतात. या दोन्ही घटनात आणि त्यांच्याच सारख्या इतर काही घटनात खूप साम्य आहे. येथे बंडाला चिथावणी देणारांनी बंडाची स्फूर्ती स्वतःच्याच गतकालिन इतिहासाकडून घेतली होती. कारण त्यांच्या इतिहासात बंडासारखे प्रसंग होते. तसेच त्यांच्या संस्कृतीमध्ये उत्तम प्रकारच्या राजकीय संस्थांचाही



अनुक्रमणिका

असंभव असल्याने भावी सत्ययुगाचे स्वतःचे स्वप्न ते त्याना माहित असलेल्या राजकीय नमुन्यांशी जोडू शकले होते. हे ते करू शकले होते याचे कारण हे आहे की, त्यांच्या स्वतःच्या संस्कृती अत्यंत संपन्न आणि गुंतागुंतीच्या असल्याने जी उदाहरणे गिरवावी अशी उदाहरणे आधीपासूनच त्यांच्यापाशी होती. त्यामुळे त्या उदाहरणावर आधारित चळवळी त्यानी आखल्या.

१८५७ चा उठाव ज्या हिंदी लोकानी घडवून आणला ते हिंदी लोक सांस्कृतिक व राजकीय विचारसरणीच्या बाबतीत प्रगत होते. राज्य करणे म्हणजे काय हे त्याना स्वानुभवावरून माहित होते. त्यांच्यामध्ये ज्यानी स्वतः राज्य केले होते असे लोक हयात होते. राजकीय संस्थांची त्याना ओळख होती. साहजिकच ब्रिटिशाना येथून घालविल्यानंतर पुढे जे सत्ययुग येथे ते प्रस्थापित करणार होते त्या सत्ययुगाचे चित्र रंगविताना त्यांचे वास्तवाचे भान सुटले नाही. या देशाच्या मागील इतिहासावरून त्यानी आपले चित्र आखले होते. पण त्यामुळे हिंदी उठावाचे विश्लेषण करताना ब्रिटिश व हिंदी इतिहासकारांची फसगत झाली आहे. ब्रिटिश इतिहासकाराना हा उठाव हा एतद्देशीय राजेरजवाडे व शिपायी यांचा गुप्त कट होता असे वाटले. तर एतद्देशीय म्हणजे राष्ट्रीय वृत्तीच्या हिंदी इतिहासकाराना तोच उठाव स्वातंत्र्यसमरासारखा वाटला. याचे कारण हे होते की, ब्रिटिश आणि हिंदी इतिहासकारांपैकी कोठल्याच पक्षाच्या ध्यानात ही गोष्ट आली नव्हती की, येथील पारंपरिक राजकीय सत्तेचे सनातन प्रतीक असे जे राजेमहाराजे ते स्वतः पुढाकार घेऊन या लढ्यात उतरले नव्हते. अथवा स्वतः होऊन त्यानी लढ्याची योजना आखली नव्हती. लढा घडवून आणण्यासाठी खटपट केली नव्हती. लढा प्रथम शिपायानी व येथल्या शेतकऱ्यानी सुरु केला हे शेतकरी एक प्रकारच्या उन्मादवायुने पछाडले गेले होते. एका बाजूला त्याना ब्रिटिशांपासून भीती वाटत होती. ब्रिटिशांच्या आक्रमणापुढे आपली पुरातन संस्कृती, धर्म, जमात नष्ट होणार असे भय त्याना वाटत होते. तर दुसऱ्या बाजूला त्यांच्या संस्कृतीमधील धार्मिक प्रतीके, कथा वगैरे आठवून त्याना हे देखील वाटत होते की, लवकरच आपली दुर्दशा संपून आपल्या चांगल्या दिवसांना प्रारंभ होणार. भीती आणि नव्या संपन्न जीवनाची ओढ यांच्या एकत्रित परिणामामुळे शिपायी आणि शेतकरी जणू देहभान विसरून अखिल हिंदी समाजाचे आदर्श कल्पनावादी शुद्धिकरण व पुनर्बांधणी करण्यास कटिबद्ध झाले होते. शिपायी व शेतकऱ्यांच्या अशा हया बेभान ताड्याने हिंदी राजेरजवाड्याना एकतर्फी स्वतःच्या घोळक्यात ओढले होते. राजेरजवाडे स्वेच्छेने उठावात सामील झाले

नव्हे. शिपायी व शेतकऱ्यांच्या जमावाने त्यांच्यावर जोरजबरदस्ती करुन त्याना उठावात सामील व्हावयास भाग पाडले होते.

उठावात सामील होण्याचा अग्रक्रम शिपायांकडे जातो. उठावात राजेरजवाडे शिपायांच्या नंतर सामिल झाले असल्याने त्यांचे स्थान केव्हाही दुय्यम आहे. उठाव घडवून आणण्यातली वैयक्तिक कर्तबगारी विचारात घेतल्यास उठावातल्या या राजेरजवाड्यांची स्थिती केवळ आनुषंगिक होती असेच म्हणावे लागेल. इतकी की हिंदुस्थानात हे जे सांस्कृतिक स्वप्ननाट्य उलगडत होते त्या स्वप्ननाट्यातली त्यांच्या वाटची भूमिका वजावण्यात जर राजेरजवाड्यानी आढेवेढे घेऊन टंगळमंगळ केली असती तर ब्रिटिशांबरोबरच त्यांची मुंडकी मारावयासुद्धा शिपायानी अनमान केले नसते.

ज. द. जोगळेकर

– समाप्त –





अनुक्रमणिका

" नवी क्षितिजे " विषयी माहिती.

प्रकाशक स्थळ : ३२९, वि. प. रोड, मुंबई-४.

प्रसिद्धीचा नियतकाल : त्रैमासिक ( जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर महिन्याच्या पहिल्या तारखेस ).
मालक, मुद्रक, प्रकाशक :— सौ. शुभांगी जोशी.
राष्ट्रीयत्व :— भारतीय.
पत्ता ३२९, वि. प. रोड, मुंबई – ४.
संपादक :— १) श्री. विश्वास पाटील. ( मुंबई )
राष्ट्रीयत्व :— भारतीय.
पत्ता :— पुष्पकुंज, पालखीवाडी, १३, काशिनाथ धुरुमार्ग, मुंबई – २८.
(२) श्री. नाना जोशी.
राष्ट्रीयत्व :— भारतीय.
पत्ता :— ३२९, वि. प. रोड, मुंबई – ४

मी सौ. शुभांगी जोशी जाहीर करते की, वर दिलेला तपशील माझ्या माहितीप्रमाणे व समजुतीप्रमाणे बरोबर आहे.
१ डिसेंबर १९८०

सौ. शुभांगी जोशी
प्रकाशक

अनुक्रमणिका